


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुररस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

# हार्दिक अभिनंदन !

विद्रोही साहित्याचे जनक
जनस्थान पुरस्काराचे मानकरी
बाबूराव बागूल



'पद्मश्री' विभूषित
डॉ. यु. म. पठाण
संत वाङ्मयाचे गाढे अभ्यासक





महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक क्र. ३२०
जानेवारी ते मार्च २००७

• • •



• • •

प्रकाशक
डॉ.वि.भा.देशपांडे




महाराष्ट्र साहित्य परिषद
टिळक रस्ता, पुणे ४११०३०
दूरभाष- २४४७५९६३

अनुक्रमणिका



## अनुक्रम



*मुद्रक-प्रकाशक*
डॉ. वि. भा. देशपांडे
प्रमुख कार्यवाह
महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रस्ता, पुणे ४११०३०.

*संगणकीय अक्षरजुळणी, मुद्रणस्थळ*
जंगम ऑफसेट प्रा. लि., २५/१० नांदेड फाटा,
सिंहगड रस्ता, पुणे - ४११०४१

किंमत १५/- रुपये

प्रकाशन : एप्रिल २००७



**महाराष्ट्र साहित्य पत्रिका**
फॉर्म नं.४ नियम ८ अन्वये निवेदन

१) प्रकाशन स्थळ: महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रस्ता, पुणे - ४११०३०
२) प्रकाशनाचा काळ : त्रैमासिक
३) मुद्रक प्रकाशक : डॉ.वि.भा.देशपांडे, प्रमुख कार्यवाह महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रस्ता, पुणे - ४११०३०
४) संपादक : डॉ. सु. प्र. कुलकर्णी महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रस्ता, पुणे - ४११०३०
५) मालक : महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रस्ता, पुणे - ४११०३०

मी डॉ.वि.भा.देशपांडे असे जाहीर करतो की, वरील तपशील माझ्या माहितीप्रमाणे व समजुतीप्रमाणे खरा आहे.

डॉ. वि. भा. देशपांडे
प्रकाशक

# संपादकीय

*महाराष्ट्र साहित्य पत्रिकेच्या बाह्य आणि आंतर स्वरूपात बदल करण्याच्या प्रयत्नाला बहुतेकांचा अनुकूल प्रतिसाद मिळाला आहे. काही ज्येष्ठ साहित्यिकांनी याबाबत जे मार्गदर्शन केले आहे; त्याबद्दल संपादक मंडळाच्या वतीने मी आभार मानतो.*

*नव्या वर्षातील, मराठी साहित्य क्षेत्रास अभिमान वाटावा अशा अभिनंदनास्पद घटनांचा उल्लेख केल्याशिवाय पुढे जाता येणार नाही. या निमित्ताने ही एक स्मरणसाखळी...!*

***जनस्थान पुरस्काराने सन्मानित बाबूराव बागूल***

*कुसुमाग्रज-प्रतिष्ठानच्या वतीने एक वर्षाआड कुसुमाग्रजांच्या जन्मदिनी (२७ फेब्रुवारीला) दिला जाणारा प्रतिष्ठेचा जनस्थान पुरस्कार, विद्रोही साहित्याचे जनक श्री.बाबूराव बागूलांना मिळाला आहे. त्याबद्दल त्यांचे म.सा.प.च्या वतीने हार्दिक अभिनंदन ! यापूर्वी जनस्थान पुरस्काराने-विजय तेंडुलकर, विंदा करंदीकर, इंदिरा संत, गंगाधर गाडगीळ, व्यंकटेश माडगूळकर, श्री.ना.पेंडसे, मंगेश पाडगावकर, नारायण सुर्वे यांना सन्मानित करण्यात आले. महाराष्ट्राच्या सांस्कृतिक जीवनावर ठसा उमटविणाऱ्या मराठी भाषेतून लेखन करणाऱ्या साहित्यिकांना हा पुरस्कार दिला जातो. यंदा श्री.बाबुराव बागुल यांना हा पुरस्कार मिळाल्याने १९५२ पासून ललित आणि वैचारिक साहित्यातील विद्रोही साहित्याच्या मूलस्त्रोताचा सत्कार झाल्याचे मानले जात आहे. 'जेव्हा मी जात चोरली' आणि 'मरण स्वस्त होत आहे' या त्यांच्या कथासंग्रहांने प्रस्थापित काळाला धक्के बसले. 'सूड', 'अघोरी', 'कोंडी' इ.कादंबऱ्या याबरोबरच 'आंबेडकरी भारत' (खंड १ व २) आणि 'दलित साहित्य - आजचे क्रांतिविज्ञान' हे चिंतनशील समीक्षात्मक लेखन मराठी साहित्यातील मैलाचे दगड आहेत.*

*'वेदाआधी तू होतास' म्हणून मानवाला गौरविताना कवी बागुल म्हणतात- सूर्याला सूर्य आणि चंद्राला चंद्रपण देणारा माणूस वेदाआधीचा आणि अफाट कर्तृत्वाचा आहे. मानवाच्या या क्रांतिकारी शक्तीवर त्यांचा गाढा विश्वास आहे.*

***श्रीमती आशा बगे यांना साहित्य अकादमी पुरस्कार***

*गेली ३०-३२ वर्षे कथा- कादंबऱ्यांचे लेखन करणाऱ्या नागपूरच्या श्रीमती आशा बगे यांना, त्यांच्या 'भूमी' या कादंबरी- लेखनास, साहित्य अकादमी पुरस्कार मिळाला. याबद्दल त्याचे मनःपूर्वक अभिनंदन! 'मारवा', 'झुंवर', 'चंदन', 'अनंत', 'दर्पण' इ.कथासंग्रह आणि 'धर्मक्षेत्रे-कुरुक्षेत्रे', 'सेतु', 'त्रिदल', 'भूमी' इ. कादंबऱ्या त्यांच्या नावावर आहेत. श्रीमती बगे यांच्या कादबंऱ्यामध्ये कुटुंब, नातीगोती, स्त्री-पुरुष संबंध, मानवी नातेसंबंधातील भावबंध- या सर्व वाटा- अडथळा- पळवाटांमध्ये स्त्रीच्या अचल व्यक्तिमत्त्वाची एक ठाम भूमी आहे. 'भूमी' कादंबरीतील मैथिली ही आपल्या अनाथ -पोरकेपणातून समंजस मार्ग काढते. तीच स्त्रीची शक्ती आहे. श्रीमती बगे यांच्या कादंबऱ्यातील नायिका आक्रमक स्त्रीवादी नाहीत. किंबहुना स्त्री-पुरुष असा भेद न मानता त्या भिन्न व्यक्तिरेखा असतात. परंपरा आणि नवतेच्या आवर्तात न भरकटता आत्मभानाच्या घट्ट भूमीवर ठाम असतात.*

*श्रीमती आशा बगे यांचे अभिनंदन !*

***'अर्धविरामकार' आ.यशवंतराव गडाख पाटील***

*अहमदनगरच्या ७०व्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचे आयोजक स्वागताध्यक्ष आमदार यशवंतराव गडाख पाटील यांचे 'अर्धविराम' हे आत्मचरित्र खूप गाजले. एक सामान्य शेतकरी कुटुंबातील मुलगा राजकारण, समाजकारण, शिक्षण उद्योग आणि साहित्यक्षेत्रात कार्य करून आपल्या व्यक्तिमत्वाचा ठसा सर्वांच्या मनावर उमटवितो याचे प्रेरक आत्मकथन लोकप्रिय झाले. या ग्रंथाचा पुणे विद्यापीठाने पदवी परीक्षेच्या मराठीच्या अभ्यासक्रमात समावेश केला. केसरी-मराठा संस्था इ.अनेक पुरस्कार यास मिळाले आता या हिंदी ग्रंथाचा अनुवाद प्रा.निशिकांत ठकार यांनी केला असून या हिंदी आवृत्तीचे प्रकाशन भारताचे पंतप्रधान डॉ.मनमोहनसिंग यांच्या हस्ते दिल्लीला विधान-भवनात झाले आहे. आमदार गडाख-पाटील यांचे म.सा.प तर्फे हार्दिक अभिनंदन !*

***स्त्रियांची शतपत्रे***

*शंभर वर्षातील स्त्री-जीवनाचे बोलके रुप दर्शविणारी, स्त्री-चळवळीच्या बदलत्या अनुभवविश्व व मानसिकतेचे*

सम्यक् दर्शन घडविणारी १८५० ते १९५० या काळातील समकालीन नियतकालिकातून प्रसिद्ध झालेली 'स्त्रीयांची शतपत्रे' ह्या डॉ.स्वाती कर्वे यांच्या संशोधन प्रकल्पाने साहित्याच्या इतिहासाचे एक पूरक साधन म्हणून मोलाची भर घातली आहे. एका चळवळीच्या इतिहासाचा सामाजिक दस्तऐवज निर्माण केल्याबद्दल डॉ.स्वाती कर्वे आणि त्यांचे मार्गदर्शक डॉ.द.दि.पुंडे यांचे अभिनंदन!

**डॉ.यू.म.पठाण यांना पद्मश्री**

गेली उणीपुरी ४०-४५ वर्षे अव्याहतपणे संतवाङ्मयाचे रसाळ वाणीने विवेचन करणारे अभ्यासू लेखक आणि वक्ते डॉ.यू.म.पठाण यांना पद्मश्री पुरस्काराने गौरविले. देशपातळीवरील हा मराठी भाषेचा सन्मान आहे. डॉ.यू.म.पठाणांचे सर्व थरात अभिनंदन होत आहे. महाराष्ट्र साहित्य परिषदेतर्फे त्यांचे अभिनंदन !

**लोकमान्य ते महात्मा**

सत्याग्रहाचा शताब्दी महोत्सव नुकताच (२९,३० जानेवारी २००७) साजरा झाला. या पार्श्वभूमीवर तत्त्वज्ञानाचे प्राध्यापक आणि सामाजिक-राजकीय चळवळीचे भाष्यकार, संतवाङ्मयाचे अभ्यासक डॉ. सदानंद मोरे यांनी 'लोकमान्य ते महात्मा' ह्या ग्रंथात - राजकीय असंतोषाचे जनक ते राजकीय असंतोषाचे संयमी समन्वयक-असा राजकीय चळवळीच्या स्थित्यंतराचा प्रदीर्घ कालपट उलगडला आहे. 'जहाल आणि मवाळ' ही त्या काल-चरित्राची दोन ढोबळ अविभाज्य अंगे होती. डॉ.मोरेंच्या म्हणण्याप्रमाणे त्याला जुना करार आणि नवा करार म्हणा ! लोकमान्य ते महात्मा ह्या कालप्रवाहात अनेक ताणे-बाणे असलेला एकच कालप्रवाह. म्हणूनच टिळक 'लोकमान्य' तर गांधीजी 'महात्मा' होते. या दोन शब्दांना डॉ.मोरे यांनी ...'ते'... उभयान्वयी अव्ययाप्रमाणे जोडून कालचरित्रातील सहज स्थित्यंतराचे दर्शन घडविले ; आणि टिळक विरूद्ध गांधी या समीकरणाला छेद दिला आहे. डॉ.मोरे यांनी स्वातंत्र्यचळवळीच्या इतिहासाचे मार्मिक विश्लेषण करून मराठी साहित्याला अनमोल देणगी दिली आहे. त्यांचे हार्दिक अभिनंदन !

म.सा.प.ने त्यांना कै.शं.ना.जोशी पुरस्कार देऊन गौरविले आहे.

**अभिनंदन - डॉ.भगवान ठाकूर**

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे गेली १५-२० वर्षे कार्यकारी मडळ सदस्य असलेले डॉ भगवान ठाकूर नुकतेच पुण्याच्या वाडिया कॉलेजचे प्राचार्य म्हणून नियुक्त झाले आहेत. फुलै आंबेडकरी चळवळीतील एक लक्षणीय नाव म्हणून ते सुपरिचित आहेत. उत्तर महाराष्ट्र विद्यापीठ, डॉ.बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ येथे मराठीचे प्राध्यापक म्हणून त्यांनी काम केले. अश्वघोषाच्या बुद्धविचारांच्या तोडीचे 'आंबेडकरी जलसे' हा त्यांच्या अभ्यासचिंतनाचा विषय ग्रंथरूपाने सुगावा प्रकाशनाने प्रकाशित केला आहे. 'स्ट्रीट लाईट्स्' ह्या त्यांचा कवितासंग्रहाच्या दोन आवृत्ती निघाल्या. विधायक विद्रोही कविता म्हणून त्यांचा गौरव झाला. त्यांना महाराष्ट्र राज्याचा लेखन पुरस्कारही प्राप्त झाला. महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या ह्या कार्यकर्त्याचे अभिनंदन !

**प्रा.जवाहर मुथा** यांना प्रतिष्ठेचा 'दर्पण' पत्रकारिता पुरस्कार नुकताच प्राप्त झाला. प्रा.मुथा हे किर्लोस्करच्या संपादक मंडळात उपसंपादक होते. 'नगर संकेत' हे त्यांचे साप्ताहिक हिंदी-मराठी, साहित्य-कला संस्कृतीचा परिचय करून देणारे वैशिष्ट्यपूर्ण साप्ताहिक आहे. प्रा.मुथा हे जोतिष-शास्त्राचे अभ्यासक असून 'भविष्यवेध' ह्या त्यांच्या पुस्तकास राज्य पुरस्कार प्राप्त झाला आहे. 'मंदाश्री' हा ज्योतिषशास्त्र क्षेत्रातील प्रतिष्ठेचा पुरस्कार त्यांना प्राप्त झाला. त्याबद्दल त्यांचे हार्दिक अभिनंदन!

**श्री.ना.पेंडसे-एका महापर्वाची इतिश्री**

टिळकयुगाला कादंबरीमध्ये व्यक्त करणारी 'हाक आभाळाची' पूर्ण करून लेखणी विराम पावते ना पावते तोच वयाच्या ९५ व्या वर्षात पदार्पण केलेले मराठी साहित्यातील भीष्माचार्य, श्री.ना.पेंडसे यांनी आपल्या जीवनकार्यालाही पूर्णविराम दिला. एल्गार, हत्या, गारंबीचा बापू, रथचक्र हद्दपार, यशोदा, कलंदर, लव्हाळी, आक्टोपस, गारंबीची राधा, कामेरू, धागर रिकामी रे रंगमाली, तुंबाडचे खोत अशा एकापेक्षा एक सरस कादंबरी लेखनाने 'श्री.ना' हे नाव मराठी साहित्यात दीपस्तंभासारखे मार्गदर्शक ठरले!श्री.ना.पेंडसे ह्या नावाने मराठी प्रादेशिक कादंबरीच्या पलीकडे जाऊन लव्हाळी- ऑक्टोपस या कादंबऱ्यांनी माणूसपणाचे विशाल दर्शन घडविले. कादंबरीबरोबरच त्यांच्या लेखणीने घडविलेला

नाट्याविष्कार-महापूर, राजेमास्तर, संभूसाच्या चाळीत, गारंबीचा बापू, यशोदा, असं झालं आणि उजाडलं, डॉ. हुद्दार, चक्रव्यूह इ.नाट्य लेखनाने-लोकमान्य झाला. 'जुम्मन' हा कथासंग्रह, 'खडकावरील हिरवळ', यातील व्यक्तिचित्रे आणि उद्याच्या कादंबरीकारांशी मुक्तसंवाद, एक दुर्लक्ष स्नेह इ.वैविध्यपूर्ण लेखनाने 'श्रीनां'च्या लेखनाची श्रीमंती वाढली.

सभासमारंभ आणि मानसन्मान यापासून 'श्रीना' दूर राहिले. त्यांच्या 'रथचक्र' ला साहित्य अकादमीचा पुरस्कार मिळाला असला तरी रसिकांच्या मनाने त्यांना केव्हाच ज्ञानपीठ पुरस्कार बहाल केलेला होता. जनस्थान पुरस्कारानेही त्यांना सन्मानित केले आहे.

'श्री.नां.नी आपल्याला पुरस्कारांच्या रुपाने मिळालेली रक्कम सुमारे दीडलाख एस्.एस्.सी परीक्षेत रत्नागिरी-रायगड-सिंधुदुर्ग जिल्ह्यातून गुणवत्ता यादीत प्रथम येणाऱ्या विद्यार्थ्याला, ज्ञानोपासक बाबासाहेब आंबेडकर आणि द्रष्टे समाजसुधारक र.धों.कर्वे यांच्या नावाने पुरस्कार देण्यासाठी श्री.मधु मंगेश कर्णिक यांच्याकडे सुपुर्त केले होते.

**कमलेश्वर**

हिंदी साहित्यातील नवकथा आणि कादंबरीकार 'कमलेश्वर'-एक जाणकार संपादक व मानवतावादी साहित्यिक म्हणून सर्वज्ञात आहेत. 'हंस आणि सारिका' या नियतकालिकाचे ते संपादक होते. मराठीतील दलित साहित्याच्या चळवळीचे ते जाणकार समीक्षक होते. 'सारिका' चा एक खास दलित साहित्य विशेषांक यासाठी त्यांनी संपादित केला होता. 'बलुतं' कार दया पवारांना त्यांनी प्रोत्साहन दिले होते. 'मौसम', डाकबंगला, काली आँधी, समुद्रमे खोया हुआ आदमी इ.कादंबऱ्यांनी हिंदी साहित्यावर त्यांची नाममुद्रा कोरली होती. मुंबई आकाशवाणीचे ते संपादक होते.

**ह्या अंकात....**

ह्या अंकात विविध विषयांना स्थान दिले आहे. एकाच विषयाला वाहिलेल्या अंकात विषयांची विविधता आणण्यास मर्यादा पडतात. नगरच्या ऐतिहासिक वस्तु - संग्रहालयाचे संस्थापक सुरेश जोशी यांनी 'बापरुक्मा-देवीवरू' अशी समाप्तिमुद्रा असलेल्या अभंगाच्या बाडाचे संशोधन-समीक्षण केले आहे. संत मुक्ताईच्या प्रज्ञावंत रूपाचा डॉ.केतकी मोडकांनी घेतलेला मागोवा सुजाता शेणई यांनी तर तुकोबाच्या सदेह वैकुंठगमनाचा आध्यात्मिक प्रवास डॉ.शोभा घोलप आणि सौ.रजनी पतकी यांनी उलगडून दाखविला; त्याचा डॉ.सुप्रिया पंडितांनी परिचय करून दिला आहे.

आपल्या आगळ्यावेगळ्या संपादन कौशल्याने अनेक महनीय व्यक्तींच्यां जीवनातले मार्गदर्शक सूत्र शोधून ग्रंथरूपाने वाचकांच्या हाती देणारे कवि अरुण शेवते संपादित 'ते दश त्या क्षणांचे' ह्या जीवनावरील बहुरंगी श्रद्धेचे प्रेरक दर्शन टी.एन्.परदेशी यांनी शोधले आहे. याशिवाय मराठी कादंबरीकारांनी फारसे लक्ष न दिलेल्या 'फाळणी' या विषयावर इंग्रजी साहित्यात लिहिलेल्या कादंबऱ्यांचा परिचय प्रा.पद्माकर पुंडे यांनी करून दिला आहे. विद्रोही साहित्याची 'वज्रमूठ' आणि विशुद्ध आनंदयात्री 'छांदस्' या काव्यसंग्रहाचा परिचय आहे.

नाटककार रांगणेकर, राजकवी काळेले, महाराष्ट्र काव्य-कोकीळ सोपानदेव चौधरी, मुलांचे नाना-गोपीनाथ तळवलकर, विनोदकार श्या.नी.ओक यांच्या जन्म-शताब्दीचे हे वर्ष असल्याने त्यांच्या साहित्यसेवेची आठवण लेख आणि चौकटीच्या रूपाने जागोजागी जागविली आहे. साहित्यिक वि.वि.बोकील यांच्या चाहत्यांनी म.सा.प.च्या सहकार्याने या वर्षी (१९०३ ची जन्मशताब्दी) साजरी करण्याचे योजिले आहे. त्यामुळे त्यांचीही आठवण या अंकात चौकटीच्या रूपाने दिसेल.

पुढच्या अंकाचा काही भाग गेल्या दशकातील गाजलेल्या साहित्यकृतींचा आढावा आणि वात्रटिकांचे साहित्यातील स्थान या विषयांची चर्चा करणारा असावा, अशी अपेक्षा आहे. तो जोडअंक असेल.

ह्या अंकासाठी सहकार्य करणारे लेखक आणि जाहिरातदार यांचे आभार!

संपादक
७, गायकवाड कॉलनी, सावेडी रोड, अहमदनगर ४१४००३.
दूरभाष : ०२४१ - २४२९७५५





# मो. ग. रांगणेकर : प्रयोगशील नाट्यधर्मी

डॉ. वि. भा. देशपांडे

मोतीराम गजानन रांगणेकर यांचे हे जन्मशताब्दी वर्ष. १० एप्रिल १९०७ सालचा त्यांचा जन्म. १९०७ ते १९९५ असा ८७ वर्षांचा सविस्तर, उत्तम कालखंड त्यांना लाभला. मिळालेल्या आयुष्याचे त्यांनी सार्थक केले असेच म्हणावे लागेल. कारण या कालखंडात अनेक स्वरूपाच्या गोष्टी त्यांनी करून पाहिल्या आणि त्यावर आपली नाममुद्रा प्रस्थापित केली.

रांगणेकरांच्या नावाचा उच्चार केला की ते नाटककार होते असे चित्र आपल्या डोळ्यांसमोर येते. ते खरेही आहे, पण तेवढेच मात्र नाही. रांगणेकर जसे नाटककार होते, तसे ते पत्रकार, संपादक, कथाकार, कादंबरीकार, पटकथाकार, गीतरचनाकार, चित्रकार, दिग्दर्शक, नाट्यनिमिति, संस्था-चालक असे खूप काही होते. एक माणूस एकाच आयुष्यात इतकी क्षेत्रे धुंडाळून काही प्रत्यक्षात काम करू शकतो, हे अनेकांना चकित करणारे आहे. यातले त्यांनी काहीही आयुष्याचे ध्येय म्हणून केले नाही. त्यासाठी कोणत्याही स्वरूपाचे औपचारिक प्रशिक्षण घेतले नाही. ज्या ज्या वेळी जे मनात येत गेले, परिस्थितीने करावे लागले; ते स्वीकारणे झाले. मात्र एखादी गोष्ट मनात आली की, ती तडीस न्यायची हा ध्यास होता. त्यासाठी पडेल ते कष्ट घेण्याची तयारी होती. आवश्यक ती जिद्द होती. जीवनात येणारे आवाहन आणि आव्हान सतत झेलण्याची वृत्ती होती. त्यातूनच आरंभीच्या काळात ते संपादक झाले. वयाच्या १६-१७ व्या वर्षी त्यांनी 'तुतारी' नावाचे हस्तलिखित तयार करून संपादक रांगणेकर हे आपले नाव सर्वांसमोर ठेवले. ती संपादनाची वाटचाल पुढे चालत राहिली. त्यातून पुढे 'चित्रा', 'आशा', 'वसुंधरा', 'सत्यकथा' इत्यादी नियकालिकांचे संपादकपद त्यांच्याकडे आले. नव्याने साप्ताहिक, मासिक काढण्यासाठी जे अर्थबळ लागते ते रांगणेकरांकडे नव्हतेच. खिशात पैसा नसला तरी आपण संपादक व्हावे ही प्रबळ इच्छा होती. याचा अर्थ सरळ होता की, केवळ मिरविण्या-साठी किंवा कोणाकडे तरी प्रतिष्ठितपणे नोकरी करण्यासाठी त्यांनी संपादकपद स्वीकारले नाही. तर ती ऊर्मी आतून त्यांना साद घालीत होती. त्याचबरोबर संपादक होणे म्हणजे केवळ आलेला मजकूर तपासून देणे; किंवा ते छपाईचे काम मार्गी लावणे एवढाच अर्थ अभिप्रेत नव्हता, तर आपला वाचक कोण आहे, त्याला कोणते विषय आवडतात किंवा आवडायला हवेत यांचा अंदाज घ्यावा लागतो. तशा पद्धतीने लिहिणारे लेखक शोधावे लागतात. त्यांच्याकडून तो विषय नेमकेपणाने लिहून घेऊन नेमकेपणाने पोहोचवणे महत्त्वाचे असते. प्रसंगी स्वतः त्यातले काही लिखाण आपण करावे लागते; याचे भान रांगणेकरांना मोठ्या प्रमाणात होते. संपादकपदाची कामगिरी बजावीत असतानाच त्यांनी स्वतःचे लेखन चालू ठेवले. काही कथा लिहिल्या. कादंबरीचेही लेखन केले. अनेक जुन्या नव्या लेखकांना लिहिते केले. रांगणेकरांनी संपादन केलेल्या नियकालिकांचे अंक मोठ्या प्रमाणात आता उपलब्ध नाहीत, परंतु जे उपलब्ध आहेत त्यावरून कामगिरीचा अंदाज येतो. त्यातले काही चाळताना किंवा उपलब्ध कात्रणे पाहताना ध्यानात येते की, रांगणेकर स्वतः उत्तम दर्जाचे विनोदी लेखन करीत असत. विनोदनिर्मितीसाठी निवडलेले विषय आणि त्याचा विस्तार पाहिला म्हणजे रांगणेकरांच्या लेखनातील-स्वभावातील मिष्किलपणा किती खोलवरचा होता याचा प्रत्यय येत राहतो. उदा. 'कुलीन नटींचे संमेलन', 'एक ते एकसष्ट', 'दिवाळीनिमित्त आकाशवाणीवरचे कार्यक्रम' इत्यादि.

रांगणेकर काही काळ चित्रपटक्षेत्रातही गेले. तिथे पटकथा लेखनाचा उद्योग त्यांनी केला. परंतु त्यात ते रमले नाहीत. त्यांना आतून सारखे वाटत होते, की आपण जसे संपादन करावे, तसेच नाट्यलेखनही करावे. नुसते वाटत नव्हते, तर त्यांनी १९४१ साली पहिले नाटक लिहिले. ते पुढे पंचवीस वर्षे नाट्यलेखन करीत राहिले. त्यासाठी त्यांनी

'नाट्यनिकेतन' नावाची संस्था काढली. प्रत्येक तीन महिन्यांनी एक नवे नाटक आपण आपल्या नाट्यसंस्थेच्या वतीने करावे असा निर्धार केला. या निर्धारातूनच रांगणेकरांनी २१ नाटके आणि ५ एकांकिका यांचे लेखन केले. 'वहिनी','आशीर्वाद','माहेर','माझे घर','कुलवधू', 'रंभा', 'एक होता म्हातारा', 'भटाला दिली ओसरी', 'लिलाव', 'आले देवाजीच्या मना','अलंकार' अशी विविध नाटके लिहिली; आणि सादर केली. तिथेच रांगणेकर नाटककार, दिग्दर्शक, नाट्यनिर्माते अशा अनेक विरूदांनी ओळखले जाऊ लागले. १९४१ ते ५५ या पंधरा वर्षांतील या नाटकांनी मराठी रंगभूमीला मोठा आधार दिला. त्या काळात मराठी रंगभूमीची स्थिती उताराला लागली होती. वरेरकर, अत्रे यांच्या नाटकांचे प्रयोग चालू होते, तरीही आपली नाट्यसंस्था निर्माण करून, स्वत: लेखन-दिग्दर्शन करून रंगभूमीच्या क्षेत्रात ठामपणाने उभे राहण्याची गरज होती. प्रेक्षकांना पौराणिक-ऐतिहासिक, संगीत नाटकांचा कंटाळा आलेला होता. संगीताच्या अतिरेकानेही प्रेक्षक हैराण होता. तशातच चित्रपट हे एक नवे रंजन माध्यम मराठी









जीवनात प्रवेशले होते. अशा संभ्रमित-संक्रमण काळात रांगणेकरांच्या नाटकांनी-प्रयोगांनी केलेली कामगिरी लक्षणीय स्वरूपाची होती. आपण जे जगलो त्या वास्तव जीवनातले कौटुंबिक विषय घेऊन, सुटसुटीतपणे तीन अंकात मांडून, आवश्यक तेवढी भावगीत स्वरूपाची संगीताची जोड देऊन रांगणेकरांनी आपला नाट्यसंसार उभा केला. त्यातले आर्थिक धक्के सहन केले. यशापयशाची गणिते कुरवाळीत न बसता जिद्दीने रांगणेकर नाटक करीत राहिले. रंगभूमीला तगवीत राहिले.

१९४०-५० च्या दशकात मराठी नाटककारांवर नार्वेजिअन ख्यातनाम नाटककार हेन्रिक इब्सेन याच्या नाट्यलेखनाचा फार मोठा प्रभाव होता. विशेषत: भा. वि. वरेरकर, आचार्य प्र. के. अत्रे, अनंत काणेकर, श्री. वि. वर्तक आणि रांगणेकर इत्यादी नाटककारांवर एक प्रवेशी - एका अंकी (वनॲक्ट वनसीन) सामाजिक विषयावरचे वास्तव नाटक असे त्या नाटकाचे दर्शनी रूप होते. ते मराठी नाटककारांनी ढोवळपणाने घेतले. मात्र इब्सेनच्या नाटकाच्या अंतरंगाची उंची किंवा खोली कोणत्याच मराठी नाटककाराला गाठता आली नाही. रांगणेकरही त्याला अपवाद नव्हते. रांगणेकरांना याची कल्पना होती की, आपल्या नाट्यलेखनाला फार मोठे वाङ्मयीन मूल्य नाही. तरीही प्रयोगमूल्य मात्र नक्की आहे. तीच त्यांची दृष्टी होती आणि मर्यादाही ! पण जाणत्या मर्यादेतही रांगणेकरांची प्रयोगशीलताही महत्त्वाची होती. त्यांनी विषयांच्या मांडणीचे जसे प्रयोग करून पाहिले, तसेच त्यातल्या संगीताचेही प्रयोग केले. मा. कृष्णराव फुलंब्रीकर, केशवराव भोळे यांच्यासारखी सृजनशील संगीतकार मंडळी त्या काळात रांगणेकरांच्या भोवती होती. ज्योत्स्नाबाई भोळे यांच्यासारखी लडिवाळ आवाजाची गायक-अभिनेत्री सहकारी म्हणून होती. या साऱ्यांच्या मदतीने रांगणेकरांनी नाट्यमाहोल निर्माण केला. रांगणेकरांच्या प्रयोगशीलतेत आणखी एक महत्त्वाचा भाग होता, तो म्हणजे जुन्या कलावंतांचे सहकार्य घ्यायचे आणि त्याच बरोबरीने नवोदितांना प्रोत्साहित करायचे. जुन्या जाणत्या कलावंतांमध्ये चिंतामणराव कोल्हटकर, गजानन जहागीरदार, मामा पेंडसे, दुर्गा खोटे, चंद्रकांत गोखले अशी बिनीची नावे होती. नव्या, उत्साही कलाकारांमध्ये ज्योत्स्ना भोळे, मा. अविनाश तर होतेच, पण पु. ल. देशपांडे, आत्माराम भेंडे, प्रभाकर पणशीकर, स्नेहप्रभा प्रधान, सुधा करमरकर, कुसुम कुलकर्णी, नंतरच्या काळात श्रीकांत मोघे अशा अनेकांना दिग्दर्शित केले, प्रोत्साहित केले. रांगणेकरांच्या नाट्यप्रयत्नातूनच पु. ल. देशपांडे, प्रभाकर पणशीकर हे नट म्हणून नावारूपास आले असे म्हटले तर अतिशयोक्तीचे होणार नाही. रांगणेकरांनी स्वत: नाट्यलेखन करीत असतानाच मामा वरेरकरांनी लिहिलेली 'अ-पूर्व बंगाल' 'भूमिकन्या सीता', कानेटकरांचे 'लेकुरे उदंड झाली', गो. नी. दांडेकरांचे 'राधामाई', मो. द. ब्रह्मे, अ. वा. वर्टी, खाडिलकर यांची नाटके दिग्दर्शित किंवा सादर केली. सर्वात महत्त्वाचे म्हणजे आचार्य अत्रे यांचे 'तो मी नव्हेच!' हे १९५६ साली रंगमंचावर आलेले नाटक लोकांपर्यंत पोहोचवण्याचे महत्त्वाचे काम रांगणेकरांच्या 'नाट्यनिकेतनने' केले. अगदी नाटकाचा विषय अत्रे यांना सुचविण्यापासून नाटकाच्या नामकरणापर्यंत अनेक गोष्टींचे श्रेय रांगणेकरांचे आहे. तीन अंकी नाटकाला पर्याय म्हणून तीन एकांकिकांचे प्रयोग केले. 'फरारी', 'तुझं माझं जमेना', 'सतरा वर्षे' या एकांकिकांनी मराठी एकांकिका लेखनाचा पाया घातला. वेळप्रसंगी जुन्या आगपेटीवर 'चित्तावर फायटर' चे चित्रही काढले.

असे अनेक प्रयोग करणारे रांगणेकर नाट्यधर्मी होते. तितकेच ते संपादक म्हणूनही लक्ष्यवेधी होते. म्हणूनच वि. वा. शिरवाडकर आणि ना. सी. फडके यांनी रांगणेकरांच्या संदर्भात म्हटले आहे की, 'रांगणेकर नाटककार, दिग्दर्शक म्हणून नावारूपास आले असले तरी त्यामुळे आम्ही एक चांगला संपादक गमावला आहे.' समकालीन मोठ्या लेखकांना असे वाटावे यातच रांगणेकरांचे मोठेपण सामावलेले आहे.

मो.ग.रांगणेकरांना त्यांच्या जन्मशताब्दीनिमित्त अभिवादन !

डॉ.वि.भा.देशपांडे

*'अकल्पित' ३१/७ पटवर्धन बाग एरंडवन,*

*पुणे -४११००४.दूरभाष २५४३४८६१*

■

# श्रीज्ञानदेव व बापरूक्मादेवीवरू

सुरेश जोशी
(संस्थापक, ऐतिहासिक वस्तु -संग्रहालय, अहमदनगर)

अहमदनगर ऐतिहासिक वस्तु- संग्रहालयात जे एक अभंग-बाड सापडले त्यात 'बापुरूक्मादेवीवरू' ही समाप्तिमुद्रा असलेले अभंग मिळाले व ते संकलित केले. त्यातून निर्माण झालेल्या प्रश्नांची या लेखात श्री.सुरेश जोशी यांनी चर्चा केली आहे. ती जिज्ञासू व अभ्यासकांना मार्गदर्शक ठरेल अशी अपेक्षा आहे. - संपादक

माऊली ज्ञानदेवांच्या विचारमंथनाचे, अहमदनगरचे श्री.भारद्वाज ऊर्फ शिवरामबुवा भारदे यांनी 'ज्ञानेश्वरीकर्ते ज्ञानेश्वर व अभंगकर्ते ज्ञानदेव - एक की दोन' याची चर्चा 'सुधारका'तून १८९८-९९ मध्ये सुरू केली; आणि अवघा महाराष्ट्र ढवळून निघाला. प्रचलित प्रस्थापित श्रद्धेला धक्का देणाऱ्या या भल्याबुऱ्या संशोधनाने अनेक वारकऱ्यांनाच नव्हे; तर भांडारकर, रानडे, टिळक यांनाही या संदर्भात लक्ष घालावे लागले. नगरच्याच भिंगारकरबुवांनी प्रतिवाद सुरू केला. तेव्हा ही त्रिमूर्ती त्यांच्या पाठिशी उभी राहिली. किंबहुना प्रकाशित होत असलेल्या या लेखमालेत भिंगारकरांच्या काही मर्यादा जाणवल्याने स्वत: लोकमान्य टिळकांना लेखाची पुनर्मांडणी करून तर्कनिठ, मुद्देसूद युक्तिवाद करावा लागला. पुनर्लेखन करावे लागले.

त्यामुळे भारद्वाजांच्या कच्च्या दुव्यांवर, कल्पना व तर्क विलासावर आधारित भूमिका निष्प्रभ ठरली. ही गोष्ट मान्य झाली, तरी केवळ ज्ञानदेव जीवन, साहित्य-काळ-कर्तृत्वाकडे आंग्ल विद्याविभूषितांसह सर्व विद्वानांनी चिकित्सा सुरू केली. हा वाद निष्प्रभ झाला; तरी अजून अनेकांच्या मनात त्यासंबंधी संभ्रम आहे. याचे साद-पडसाद गेली शंभर वर्षे अधूनमधून उठत आले आहेत. मात्र ज्ञानेश्वरीकर्ते -ज्ञानदेव व अभंगकर्ते - ज्ञानेश्वर एकच असे प्रस्थापित, प्रचलित मत या वादामुळे घासून पुसून बाहेर पडले; असे मान्य केले तरी, त्यानंतरच्या काळात 'अभंग'कार ज्ञानदेवाच्या गाथेतील सर्वच अभंग आद्यज्ञानदेवांचे आहेत का ? नंतरच्या काळात अनेक संतकवींनी 'ज्ञानदेव', 'ज्ञानेश्वर' या नाममुद्रेचा वापर केला व यात तथाकथित 'तोतया'चे अभंग कालांतराने गाथेत घुसडले गेले. मिसळले गेले, अशी काही वर्षे गेली. (कारण काही असो) सर्व अभंग हे आद्य ज्ञानदेवाचेच आहेत, असे मानण्यात आले. अशाच अभंगाच्या हस्तलिखिताची गाथा (१८७७) गोंधळेकर प्रत आद्यमुद्रण प्रतीसाठी उपलब्ध झाली व पुढे त्याच्याच इतरांनी सुधारित मुद्रण आवृत्त्या काढल्या. त्यामुळे त्याचा प्रचार, प्रसार झपाट्याने झाला. श्रद्धाळू वारकरी आणि काही चिकीत्सक विद्वान-अभ्यासकांनीही अभ्यास सुरू केला.

या अभंगातील ज्ञानेश्वरी, चांगदेव पासष्टी, अमृतानुभव यातील प्रतिभा आणि प्रज्ञा यांचे परमोच्च स्वरूप पाहता अभंगातील 'खुजेपणाची' जाणीव व्यक्त होऊ लागली. तसतसे तथाकथित परंपरावादी पुढे सरसावले आणि त्यांना 'आकलन' झालेले साम्य शोधत समर्थन करू लागले. त्यामुळे नामदेवांच्या अनेकत्वाविषयी जसे अनुकूल मत होऊ लागले; तसे या ज्ञानेश्वराचे एकत्व वा अनेकत्व अजून विद्वान परीघातच गरगर फिरत आहे; असे दिसत असले, तरी अनेकत्वाच्या संख्येत लक्षणीय वाढ झाल्याचे दिसते. या संदर्भातील काही मोजक्याच नोंदी, तपशीलात फारसे न शिरता, नमूद केल्याशिवाय त्याची कल्पना स्पष्टपणे येणार नाही.

श्री. भारद्वाज वा भिंगारकरबुवा यांच्यापासून प्रेरणा घेऊन, अहमदनगरच्या ज्ञानेदव वाङ्मय अभ्यासकांनी, वाङ्मयोपासक मंडळाची स्थापना करून, १९३२ मध्येच भक्कम पाया रचला. १९३४ मध्ये श्री. 'ज्ञानदेव - दर्शन' खंड १ व २ हा मूलभूत संशोधनावर आधारित ग्रंथ संपादून प्रकाशित केला. या विषयावरचा अन्य तोलामोलाचा ग्रंथ





अनुक्रमणिका

गेल्या पाऊणशे वर्षात सहसा आढळणार नाही. तो एक मानदंड मानला जातो.

ज्ञानदेव अभ्यासकांनी तो अभ्यासण्याशिवाय दुसरा पर्याय नाही. या ग्रंथात प्रो. कृ. वे. गजेंद्रगडकर यांनी 'श्री ज्ञानदेव महाराजांचे अभंग' या आपल्या प्रदीर्घ लेखात 'अ' ज्ञानदेवाच्या अभंगाची सविस्तर चर्चा प्रथमच केलेली आढळते. त्यात प्रामुख्याने प्रक्षिप्त अभंग कोणते व का असण्याची शक्यता आहे, याचे विवेचन केले आहे. ते म्हणतात, 'ज्ञानदेवांनी हिंदी, कानडी व गुजराती भाषेत रचना केली असल्यास त्यास अधिक सबळ पुरावा पाहिजे. काही स्वतंत्र प्रकरणाइतके लांब आहेत, काहीत ज्ञानदेव सदृश्यतेचा आभास होतो. विषयोपभोग प्रत्यक्ष व्यवहारात अनुभवास आला नसतानाही अभंगातील तसे दृष्टांत, शब्द वापरून आपली वासना तृप्त झाल्याचे समाधान कोण्या अन्य ज्ञानदेवाने केले असून लोकमान्यता व दर्जा मिळावा म्हणून आद्य ज्ञानदेवाच्या गाथ्यात घुसडून दिले असावेत. काही अश्लील अभंग प्रक्षिप्त आहेत. काही चक्री, अर्थहीन वाटतात. काही रूपक, असंभवी म्हणून प्रक्षिप्त समजणे, अप्रशस्त, अक्षम्य व अशक्य वाटते. विरहिणीची तगमग, आचरण, शिकवण जीवनसर्वस्व म्हणून मुळीच संभवत नाहीत. 'कावळा पाहून शकून सांगणे, बाल-साहित्यातील कल्पना असंभाव्य वाटते' गुरुदेव रानड्यांनी या संदर्भात केलेले विश्लेषण गजेंद्रगडकरांना मान्य आहे.

या 'भेसळी'ची चर्चा आदरणीय साखरे महाराज, डॉ. शं. दा. पेंडसे, ह. भ. प. सोनोपंत दांडेकर, डॉ. शं. गो. तुळपुळे, ह. भ. प. ल. रा. पांगारकर, डॉ. प्र. न. जोशी, श्री. सु. का. जोशी, ज. र. आजगावकर या सर्वांनी करून आपापली मते, अनुमाने व्यक्त केली आहेत. या चर्चेच्या बाबतीत डॉ. मु. श्री. कानडे व श्री. रा. शं. नगरकर, म्हणतात, 'विशिष्ट अभंग ज्ञानदेवांचे नाहीत असे संपूर्ण गाथ्यातील अभ्यासाच्या आधारे सांगणे ही गोष्ट ज्ञानदेव भक्तांच्या भावना दुखावणारी ठरेल.' अशा कल्पनेने ही चिकीत्सा मागे पडली.

कोणत्याही संताच्या अभंगाच्या बाबतीत संहिता-निश्चिती हा महत्त्वाचा भाग - घटक - वगळण्यात आला आहे, असे दिसून येते.

असे असले तरी, अलिकडे म्हणजेच १९९५ मध्ये डॉ. मु. श्री. कानडे व श्री. रा. शं. नगरकर यांनी श्री ज्ञानदेवाचा सार्थ चिकीत्सक गाथा परिश्रमपूर्वक अभंगशः विवेचन, तपशील, चिकीत्सेसह प्रकाशित केला आहे. म्हणजेच १९३४ मधील प्रो. गजेंद्रगडकरांच्या लेखापासून उगम पावलेल्या अभंग निश्चितीच्या या प्रवाहाने १९९५ म्हणजेच ६० ते ७० वर्षे घेतली आहेत. या ग्रंथातील विवेचन, प्रस्तावना, संपादकाची भूमिका, त्यांची निर्णय -पद्धती व त्यानुसार होत असलेली फलनिष्पत्ती ही निश्चितच तोलामोलाची मानावी लागेल. आम्ही कै. भारद्वाजांच्या मताशी सहमत नसलो - म्हणजे श्री ज्ञानदेव दोन होऊन गेले - हे मत आम्हाला मान्य नसले, तरी अभंग लिहिणारे ज्ञानेश्वर नामक एकापेक्षा अधिक कवी होऊन गेले, याबद्दल आमच्या मनात संदेह नाही. आमचे मत ज्ञानदेवांच्या अभंगांचे काळजीपूर्वक अध्ययन केल्यानंतर बनले आहे.

ज्ञानदेवाच्या अभंग, गाथेत ज्या नाममुद्रा येतात त्यात 'ज्ञानदेव म्हणे' 'बाप-रुक्मादेवी देवी-वरु' या दोन नाममुद्रा असलेले अभंगच अधिक प्रमाणात आढळतात. स्थूल मानाने वर्गवारी मांडावयाची झाल्यास (सकल संत गाथा भाग १) एकूण नऊशे तीन अभंगांपैकी 'बाप - रुक्मा - देवीचे' चारशे त्र्याऐंशी, 'ज्ञानदेव म्हणे' चे दोनशे एकसष्ट व इतर नाममुद्रांचे फक्त एकशे एकोणसाठ अभंग असल्याचे आढळते.

श्री ज्ञानदेवांच्या आई-वडिलांचे नाव विठ्ठल-रुक्माई होते. तसेच त्यांचे आराध्य दैवतही 'विठ्ठल-रुक्माई' असल्याने व त्यांच्या अभंग गाथ्यातच ते आढळल्याने या नाममुद्रेचे म्हणजे 'बाप-रुक्मादेवी वरु' हे अभंग ज्ञानदेवांचेच आहेत, अशी श्रद्धा प्रचलित व प्रतिष्ठित झालेली आहे. हे मान्यच करावे लागेल. या संबंधी अनेकांनी आपल्या परीने व आपल्या दृष्टिकोनातून चर्चा केल्याचेही दिसते. एवढंच नव्हे, तर 'श्री ज्ञानदेव सार्थ-चिकीत्सक गाथ्याचे' संपादक डॉ. मु. श्री. कानडे व श्री. रा. शं. नगरकर यांनी स्पष्ट नमूद केले आहे की, 'ज्ञानेश्वरीमध्ये पंढरपूर, विठ्ठल, पांडुरंग यांचा निर्देश येत नाही; यावरून असे अनुमान करता येते की, ज्ञानदेवादी भावंडे ज्ञानेश्वरांचे लेखन पूर्ण झाल्यावर हिंडत-हिंडत पंढरपूरला आली. त्यांचा व नामदेवादींचा सहवास आला. त्यातून ज्ञानदेवांच्या

मनावरही विठ्ठल नामाचा प्रभाव पडून त्यांनी आपल्या अभंगात 'बाप-रुक्मादेवी वरु' ही नाममुद्रा वापरण्यास प्रारंभ केला असावा (पान नं. ३०) त्यांनी म्हटल्याप्रमाणे एकूण ११०६ अभंगांपैकी ७३० अभंग अस्वीकृत केले व फक्त ३७६ अभंगच श्री ज्ञानदेवांचे म्हणून स्वीकृत केले. त्याची कारणमीमांसा अभंगशः त्यांनी केली आहे. या स्वीकृत ३७६ अभंगांपैकी 'ज्ञानदेव म्हणे' -१८३ अभंग, व 'बाप-रुक्मादेवी वरु' या नाममुद्रेचे १९३ अभंग नोंदविलेले आढळतात. असे असले तरी आपल्या प्रस्तावनेत 'रामदासी-संशोधन-खंड' यातील बाड क्रमांकाचा तपशील देताना 'बाप रुक्मादेवी वरु' नाममुद्रांकित चार अभंग दिले आहेत.

'ज्ञानेश्वरीचा इत्यर्थ। करावया श्रीं शंभु समर्थ।
उमा होऊन प्रेमभरित। बैसली श्रवणार्थ येकांती।।१।।
येरे हेदरे अवाका। धरोनि म्हणती एकमेका।
ज्ञानेश्वरीचा चोखा। अर्थ निका सांगा तो।।२।।
ऐसिया अहंकारामाजि दडे। कोणी पोट करुनिया पुढे।
करिति ज्ञानेश्वरीचे कोडे। केव्हढे द्वाड अभागी।।३।।
ज्ञानेश्वरीचे पाठांतर। भावे करावे निरंतर।
बाप-रखुमा-देवीवरु। कृपा अपार वर्षेल पै।।४।।'

तसेच याच नाममुद्रेचा संस्कृतप्रचुर अभंगही नोंदविला आहे. प्रश्न असा निर्माण होतो की, ही नाममुद्रा नामदेवाचीच मानावी तर 'ज्ञानेश्वरी-महात्म्य' ते स्वतः कसे लिहिणार ? 'ज्ञानेश्वरी' हे नामाभिमान ज्ञानेश्वरांनी कसे केले असणार? अर्थात् नंतरच्या काळातील ज्ञानदेवांचा भक्त म्हणा, अभ्यासक म्हणा अशा कोण्या कवींची ही रचना असली पाहिजे. पण ही मुद्रा वापरणारा हा संतकवी नेमका कोण ? त्याच्या नावाचा; परंपरेचा प्रत्यक्ष नाही पण अप्रत्यक्षही मागमूस का आढळत नाही ? सहेतुकपणे वा जाणीवपूर्वक या कवीने असे 'भूमिगत' राहण्याचे कारण काय असावे ? असे अनेक प्रश्न अनेकांच्या मनात अनेक दिवसांपासून घोंगावत आहेत. त्यासाठी सबल नाही पण पुसटसा, काहीसा संशयास्पद का होईना थांगपत्ता का लागत नाही ? हे कोडे काही उलगडत नाही.

त्याचवेळी उपलब्ध गाथ्यातील 'बाप-रुक्मादेवी- वरु' या नाममुद्रेची अभंग-रचना लता मंगेशकर, आशा भोसले, भीमसेन जोशींपासून ते शाहीर साबळेंपर्यंत अनेक थोरा-मोठ्या गायकांनी जनसामान्यांच्या हृदयापर्यंत पोहोचविली आहे. (अर्थात् ज्ञानदेवांची रचना मानूनच) या अभंगातील शब्दलालित्यापेक्षाही त्यातील भावमधुरता अधिक भावते हे कसे नाकरता येईल? अशा दर्जेदार अभंगाच्या रचनाकाराने मात्र अदृश्य स्वरूपात (अगदी निर्गुण परमेश्वराप्रमाणे) का रहावे ? हा काहीसा अस्वस्थ करणारा प्रश्न नाही का? हे 'अज्ञानत्व' आणि ज्ञानदेवाच्या अभंगगाथ्यात त्यांच्या अभंगरचनेचा आढळ ; यामुळेच तर ही रचना ज्ञानदेवांची म्हणून रूढ झाली असेल का ? अशीही शंका मनात येते. शंभर वर्षापूर्वी नगर जिल्ह्यातील भारद्वाज आणि भिंगारकरबुवांनी 'ज्ञानदेव' संशोधनाची मुहूर्तमेढ रोवली. त्याच जिल्ह्यातील कै.नाथ विठ्ठल पाठक यांनी 'बापरुक्मादेवी वरु' नाममुद्रा वापरणाऱ्या कवीच्या संदर्भात प्रकाश टाकण्याचा अल्पज्ञात प्रयत्न केला होता. ते प्राथमिक शिक्षक. परंतु संशोधनाच्या हव्यासापोटी गावोगाव भटकून त्यांनी शेकडो हस्तलिखिते जमा केली. अहमदनगर जिल्हा इतिहास-संशोधन-मंडळाचे ते अनेक वर्षे चिटणीस होते. नगरमध्ये संदर्भ-साहित्याचा अभाव, चर्चेस अभ्यासक मर्यादित आणि वृद्धत्व यामुळे त्यांच्या संशोधन कार्याचा महाराष्ट्राला परिचय होऊ शकला नाही.

सध्या अहमदनगर संग्रहालयात असलेली, पैठण येथून काही वर्षापूर्वी त्यांनी हस्तलिखिताची अनेक बाडे, पोथ्या, कागदपत्रे मिळविली. त्यात गीता, नमन इत्यादी ग्रंथांसह 'रुक्मादेवीवरुचाच' हस्तलिखित - गाथा उपलब्ध झाली आहे. त्याने त्या कवीचे 'अज्ञानत्व' प्रकाशात येण्याची शक्यता वाढली आहे. वहीच्या आकाराच्या पिवळसर ३१० (उपलब्ध) पानांवर काळ्या शाईने बोरूने ठसठशीत, वळणदार अक्षरात लिहिला आहे. 'श्री परमहंस परिव्राजकाचार्य कृष्णानुचर स्वामी कृत' अशी नोंद असून प्रत्येक रचनेच्या अखेरीस 'रुक्मादेवीवरु' अशी नाममुद्रा आहे. यात अभंग, गवळणी, पदे, करुणाष्टके, लावण्या, हिंदुस्तानी-पदे इत्यादींची वर्गवारी करून विस्तृत आणि तपशीलवार अनुक्रमणिका केली आहे. कोणा सांप्रदायिकाने वा अभ्यासकाने जाणीवपूर्वक या गाथ्याचे संकलन केल्याचे स्पष्ट जाणवते. किंबहुना फिक्या काळ्या शाईत नंतर काही नोंदी करून पूर्णता आणण्याचा प्रयत्न दिसतो. सुरुवातीची व शेवटची पाने उपलब्ध नाहीत. त्यामुळे प्रतकाराचे नाव





अनुक्रमणिका

वा काळ यासंबंधी निश्चित निर्णय करणे कठीण असले, तरी एकंदरीत स्वरूप पाहता ही प्रत १७५० ते १८५० या कालावधीतील असणे शक्य आहे. तत्पूर्वीच्या जुन्या बाडातून ही नक्कल केलेली आहे यात शंका नाही. शब्दलालित्य हे जसे वैशिष्ट्य आहे, तसे भावसौंदर्यही मनाला मोहित करणारे, श्रेष्ठ दर्जाचे आहे.

केवळ तात्त्विक अध्यात्मात हा कमी रमतो. त्यापेक्षा सामान्य जनमानसात अध्यात्माची आवड निर्माण करताना आपला आत्माविष्कारही व्यक्त करतो. त्याची श्रीकृष्ण भक्ती, विठ्ठल - भक्ती अनन्यसाधारण आहे. त्याची आळवणी, तो निरनिराळ्या भूमिकेतून तादात्म्याने करतो. त्या काव्यातून त्याच्या भक्तीच्या तत्त्वज्ञानाचा उलगडा होतो. आपणास गुरूने दीक्षा कशी दिली. त्याचेही तपशीलवार वर्णन तो करतो. या गाथ्यातील अनुक्रमणिकेत नोंदविल्यानुसार ५४ गवळणी, १३ हिंदुस्थानी पदे, ३० साधी पदे, अभंग ५०, अष्टके ३०, लावण्या ४९ अशी एकूण २३१ रचनांची आकडेवारी आढळत असली तरी त्याशिवाय न नोंदविलेल्या काही वैशिष्ट्यपूर्ण रचनाही आढळतात. अभिजात साहित्यात मोडाव्यात अशा काही रचना आहेत; तर काही अगदी साध्यासुध्या भाषेत, प्रासादिक रुपातही आढळतात.

या गाथ्यातील 'श्री परमहंस परीव्रजकाचार्य कृष्णानुचर स्वामीकृत' असे दोन ठिकाणी नोंदले आहे. तेव्हा ही नाममुद्रा वापरणारे 'कृष्णानुचर स्वामी' कोण ? याविषयी जिज्ञासा निर्माण झाल्याशिवाय रहात नाही. यासंबंधी फारशी माहिती आपणास नसल्याने हे कुतूहल अधिकच वाढते. या संदर्भात कै. नाथ विठ्ठल पाठक यांनी तयार केलेल्या छोट्याशा टिपणानंतर 'कृष्णानुचर स्वामी' हे कृष्णदयार्णवाचे एक अज्ञात शिष्य असावेत. त्यांनी संन्यास घेतल्यानंतर आपले नाव अज्ञात ठेवून ही नाममुद्रा वापरण्यास सुरुवात केली असावी. कृष्णदयार्णवाचा काळ सुमारे इ. स. १६७४ ते १६९५ मानला जातो. आपल्या 'हरिवरदा' या ग्रंथाच्या प्रत्येक अध्यायाच्या समाप्ती मुद्रेत 'कृष्णदयार्णविनुचर' असा उल्लेख ते करतात. आपल्या आराध्य दैवताच्या नावाने 'माधुकरी' मागताना ते 'कृष्णदयार्णव' असे म्हणत असत. कृष्णानुचर; असा करीत नाहीत, एवढेच नव्हे तर कोपरगावच्या पंडित नीळकंठ यांचे सुपुत्र गोविंद हे आपले गुरु असल्याचा उल्लेख करताना दिसतात. या गाथेत 'कृष्णानुचर स्वामी' आपल्या गुरूचे नाव 'दिगंबर' असे अनेक ठिकाणी तपशिलाने देतात. या गाथेतील रचनांचा प्रकृतीधर्म आणि दयार्णवाच्या शिष्य परंपरेतील रचनांचा प्रकृतीधर्म यात मोठी तफावत आढळते, ते निराळेच ! साहजिकच ही नाममुद्रा घेणारी 'कृष्णानुचर' ही व्यक्ती भिन्न असल्याचा संशय मनात डोकावतो. अधिक शोध घेता 'श्रीज्ञानेश्वर-दर्शन' भाग पहिला, पान १९७ वर श्री. वि. अं. कानोले, नांदेड यांनी 'श्रीज्ञानेश्वरीच्या उपलब्ध प्रती' संबंधी तपशिलाने स्वत:जवळील नांदेड प्रतीची माहिती दिली आहे. त्यात नाथप्रतीवरून शके १५५१ वर नकललेल्या प्रतीवरून ज्या ३, ४ प्रती शके १६२४ पर्यंत करण्यात आल्या; त्यात 'श्रीकृष्णनाथानुचर' कृष्णाजी दामोधर व नाभाजिनारायण कृष्णानुचर माधव गोसावी (शके १६२४ च्या सुमारास) केल्याच्या नोंदी आल्या आहेत. माधव गोसावी (टोके) यांनी स्वअक्षरातील लेखन केल्याची माहिती देऊन भाष्य करताना श्री. कानोले म्हणतात, 'ज्ञानदेवीच्या तिसऱ्या अध्यायावर कृष्णानुचर माधवस्य' असे आपले नाव त्याखाली दिले आहे.' श्रीकृष्णनाथ

नावाच्या कोणा सत्पुरुषाचा माधव गोसावी (टोके) हा शिष्य असावा. आणखी एका पोथीवरील नामनिर्देशावरून याचा काळ नाथांच्या पश्चात् ७५ वर्षाचा ठरेल. (पान २०४).

एकनाथांचा जन्म शके १४५५ वा १४७०. परंपरागत दीक्षा शके १४८० व मृत्यू शके १५२१ मध्ये झाला. त्यानंतर ७५ वर्षे म्हणजे शके १५९६ च्या सुमारास हा काळ 'कृष्णानुचर-माधवाचा' येईल. म्हणजे कृष्णानुचर स्वामीचा काळ इ. स. १६७४ च्या पूर्वीचा मानावा लागेल. अर्थात ही चर्चा स्थूलमानाने काळ उलगडण्यास मदत व्हावी, एवढ्याचसाठी केली आहे.

अध्यात्म संस्कारांसाठी, प्रवोधनासाठी विविध लोकवाङ्मय प्रकार (भारूड वगैरे) प्रथमच नाथांनी जाणीव पूर्वक मोठ्या प्रमाणात करून समाजातील सर्व स्तरातील विविध समाजाच्या मानसिकतेनुसार हाताळले आहेत. त्याचीच गडद छाया नव्हे, तर त्याचीच 'वाट पुसतु' केल्याचे दिसते. ज्ञानेश्वरांविषयीचा कमालीचा जिव्हाळा, तादात्म्यता आणि ज्ञानदेव - साहित्याचा श्रद्धेने केलेला अभ्यास यातून श्रीकृष्णानुचरस्वामींनी आपली रचना केली असावी किंबहुना चैतन्यप्रभू (इ. स. १४८६-१५३३ तसेच श्री वल्लभाचार्य शके १४७९ ते १५१०) या दोघांच्या कृष्णभक्तीचा व तत्त्वज्ञानाचाही परिणाम झालेला जाणवतो. (अर्थात हा स्वतंत्र विषय होईल). परंतु पंढरीच्या पांडुरंगाविषयी त्याला विलक्षण ओढ आहे. त्यातील आर्तता हृदयाला पीळ पाडते. त्यातील लाडिक, सलगी जशी भावते, तसाच काहीसा फटकळपणा, तुकारामाची आठवण देतो.

'भूत पै पंढरीचे मोठे खडतर। जेंया कापती सुरासुरवर। भक्ति का ना जें का धुरंधरा' किंवा 'मोठे पिसाट दैवत हे साजणी। राहे वाटे पंढरपूर पाटणी। अर्धांगी जयाची श्री रुक्मिणी' तसेच 'तू माझा सुरतरु। सुखाचा सागरु। तुझाची आधारु माझ्या जीवा। तसेच 'नव्हे नव्हे, कोठे जीवा समाधान। न राहे मना क्षीण की काई।।'

'आहे पंढरीची कुळीची कुलदेवता। सतपदी हे ज्ञानामृत सरीता। तीच जीवाची माता आणि पिता। तीच होती प्रियतमा चित्ता।।' अशी काही उदाहरणे वानगीदाखल देता येत असली; तरी माऊली, सखी, प्रियकर इत्यादी स्वरूपातील भूमिकेतून व्यक्त होत असलेली भावनाही गोड व हृदयंगम वाटते. काही ठिकाणी प्रसंगानुसार वृत्तछंदाकरिता नाममुद्रेत रुख्मिणी-पती, रुख्मिणीरमण, राधा-रुख्मिणीवल्लभ, रुख्मिणीशु, रुख्मादेविवरु विठ्ठल इत्यादी नाममुद्रा वापरलेल्या दिसतात. हिंदुस्थानी पदांमध्ये मात्र आवर्जून 'रुक्मिणीवर' ही नाममुद्रा सर्वत्र वापरल्याचे आढळते. अशी नाममुद्रा वापरणाऱ्या कृष्णानुचरस्वामींचा काळ स्थूलमानाने सोळाव्या शतकातील (शके) मानता आला तरी कृष्णानुचर या कृष्णनाथ नावाच्या सत्पुरुषाचा शिष्य असा समजावयाचा की, कृष्णोपासक म्हणूनच घेणे संयुक्तिक ठरणार आहे ? तरीपण येथेच हा प्रश्न सुटत नाही. श्री परमहंसपरिव्रजाकाचार्य श्री. कृष्णानुचरस्वामीकृत असा उल्लेख येतो तेव्हा हे नाव व्यक्तीचे (संन्यासोत्तर) दीक्षान्त असल्याचेही स्पष्ट होते. साहजिकच 'कृष्णानुचर माधवस्य' याचा अर्थ कृष्णोपासक घ्यावयाचा की कृष्णानुचर (दीक्षांत नाव) स्वामींचा शिष्य असा घ्यावा लागेल म्हणजे कृष्णोपासकच कृष्णानुचर - स्वामींचा शिष्य माधव अशी संगती लागू शकेल. श्री कानोलेंच्या नांदेडप्रतीत या माधवाशिवाय कृष्णानुचर म्हणून 'कृष्णाजी दामोधर' आणि 'नामाजि नारायण' या दोघांनी ही प्रत केल्याचा उल्लेख तसेच पुढील काळात कृष्ण (दयार्णव) अनुचर असे अनेक उल्लेख हरिवरदाच्या समाप्तीमुद्रेत येतात. यावरून कृष्णोपासक, कृष्णानुचर (स्वामीं)नी स्थापलेला एखादा मठ पैठण मुक्कामी असण्याची शक्यता अधिक बळावते. असे जर मानले तर 'रुख्मादेविवरु' ही नाममुद्रा वापरणारे व आपल्या बऱ्याच रचनांमध्ये कृष्णाची विविध नात्याने व प्रकारांनी आळवणी केल्याचे दिसते. त्याचा पुष्टीमार्ग-संस्थापक वल्लभाचार्य वा चैतन्यप्रभू यांच्या विशिष्ट कृष्णभक्ती संप्रदायाचा प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष परिणाम झाला आहे की नाही हे अभ्यासण्याची गरज आहे.

या कृष्णानुचर स्वामींनी आपल्या गुरूचे नाव दिगंवर असे दोन तीन वेळा देऊन त्याने आपल्याला दीक्षा कशी दिली ? या संबंधीचा तपशील अतिशय बारकाव्याने दिला आहे. परंतु इतरत्र श्री सद्गुरु दिगंवराविषयी माहिती दोन तीन नोंदी वगळल्यास फारशी उपलब्ध होऊ शकली नाही. १) रामदासी संशोधन खंड १ मधील 'भक्तराज' या हस्तलिखितातील नमनात असा उल्लेख आढळतो -

'निवृत्ती ज्ञानदेव एकनाथ दिगंबरा।










मुकुंदराज प्रमुखान वंदे किर्तन सिद्ध ये।।३।।'

त्यावरून या अज्ञात संताची गणना मराठी संत मंडळीतील एक प्रमुख म्हणून होत होती असे दिसते.

२) शेख महंमदाने आपल्या 'योग-संग्रामात'

'आता माझे नमन जी सद्‌गुरु।
करावा पतीता अंगीकारु।।
तुम्ही महावरिष्ठ दिगंबरु। दीन तारक दुजे।।१२७।।
त्यांच्याच एका आरतीत 'जय जय सद्‌गुरु दिगंबरु।
कृपा करी चुकवी माझा फेरा।।
तसेच अन्यत्र 'अनादि सिद्धयोगी दिगंबरा।
अविंधा पीर, मराठ्यात साधू' ।।

असे उल्लेख आलेले आहेत. परंतु आपल्या गुरु परंपरेचा अधिक तपशील 'योग-संग्रामात' देतांना शेख महंमद म्हणतो, 'श्री सद्‌गुरु चांद बोधले। ज्याने ज्ञानोपंतासी अंगिकारले। ज्ञानोबाने एका उपदेशिली दास्य गुणे।। तसेच धन्य चंदबोधले। त्याने ज्ञानोपंताला दिले। त्याचे शिष्य धाले। एका जनार्दन।' यावरून चांदबोधले याने संन्यासोत्तर 'दिगंबर' नाव घेतले होते की दिगंबर व चांदबोधले या भिन्न व्यक्ती समजावयाच्या याचा निर्णय करावा लागणार आहे, या विषयी श्री. वा. सी. बेंद्रे यांनी 'तुकारामाचे संत सांगती' या ग्रंथात तपशीलवार चर्चा केली आहे. जनार्दन स्वामींनी, एकनाथांनी आपल्या गुरूने मलंग वेशातील दत्ताचे दर्शन घडविले आहे ते (दत्त) दिगंबर स्वरुपात दिले आहे. तेव्हा चांदबोधले म्हणजे 'दिगंबर' असावेत असे आपले मत नोंदविले आहे. यावरून एक गोष्ट लक्षात येईल की, जनार्दनस्वामी, शेख महंमद व कृष्णानुचर स्वामी हे गुरुबंधू ठरतात. बेंद्रे (कालसंगतीसाठी) म्हणतात, शेख महंमदाने अगदी पूर्ववयात आणि चांदबोधले यांच्या अखेरच्या दिवसांत दीक्षा घेतली असावी 'किंकर सरता जालो' या उल्लेखावरून त्यांना असे वाटते. शेख महंमद व कृष्णानुचर स्वामी यांचा स्थूलमानाने एकच कालखंड मानावा लागतो.

शेख महंमदाने सद्‌गुरु दिगंबराचा उल्लेख नमनाच्या स्वरूपात केला आहे. गुरूंची व्यक्तिगत माहिती वा अनुग्रहाचा तपशील देत नाहीत. त्यामुळे त्याचा उल्लेख काहीसा मोघम व संदिग्ध असल्याचे जाणवते; परंतु कृष्णानुचर स्वामी आपल्या अनुग्रहासंबंधी सविस्तर तपशील किमान दोन-तीन ठिकाणी तरी देतात. ही पदे काहीशी प्रदीर्घ असल्याने संदर्भाच्या दृष्टीने आवश्यक तेवढा भाग येथे देणे अधिक सोयीचे ठरणार आहे.

'श्री दिगंबराने निज वचना वाणले।
ह्या जना हातुनि मजला लागी पाळीले।
शिष्यत्वाते शून्य करूनिया केले। मजला असे।।
आणियले ते अलक्षलक्षा, अचिंत्य ते चिंतना।
श्री सद्‌गुरुराये ब्रीद नेले शेवटा।
मज प्रसाद दिधला सर्वाहुनि गोमटा
म्हणवोनी न रूचे मजलागी धटपटा।।
रूख्मादेवीवर गुरु राजे मेळाविले सौरसे।
लाऊनि जीवास अपुले पीसे।।५।।
गुरु महाराजे बरवे माझे केले ग साजणी।
ऐक तू शुभ त्याची कहाणी।
श्री गुरुकृपेचा जाला मज भरवसा।
ह्या स्वात्म हिताचा दिधला मज वो वसा।
तेणे सबाह्य जाला येकची मी भावसा।
सकळ ही वृत्ती श्री गुरुराये देवविली अदणी।।
(ऐक तू शुभ त्याची कहाणी)
षट्‌चक्राते आल्हादुनिया दाखविली ओवरी।
काय ग सांगू तेथील परी। रविचंद्राच्या तेजाहुनि प्रणव मूर्ती साजिरी। पाहता नाही उरली उरी। त्याला, तेथे अनुहाताचा ध्वनी।।ध्रु।। (ऐक तू शुभ त्याची कहाणी)
होते सुस्वरी। किती वर्णे वाचे सुख तेथिल मी तरी।
सर्वदा भासतो विभू जेथे हरी।।
मग सहजची परमागती। बरवी लाधली।
हरपोनि देहे भावरतीने वदे विठ्ठल-रुख्मिणी।।४।। (ऐक तू....)
''हा करुणेचा सागरु। गुरु दिगंबरू, दूर नसे।
(चाल) हा कृष्ण खरा गे निजभक्ताचा प्राण।
त्याजला नसे गे त्या जाजिवणे प्रमाण।
मी खरे सांगतो वाहून त्याची आण।
चैतन्याचे चैतन्य। जीवनात जीवन।
सर्व प्रमाणजीवी रेखिली। मज बछाची गाय।
गुरु महाराज अळविल्या मने। नाही केली साजणी।
ऐक कहाणी, अन्य साधने।
माझे बरवे अवघे केले या विठ्ठले। श्री रुख्मिणीचावारु, प्राणप्रिय करु। विभू सद्‌गुरु। मायमाऊली। स्मरताची

साजरी। माय झडकरी। मज पावली।।४।।

राधारमणे सर्वज्ञे वर्षुनि करुणामृता। दिधली मजला निजात्मता।। श्रीमुद्रा लेऊन तुळशीची भूषणे। खळाते आणियले की उणे।। श्री गुरुवर्ये, प्रतापसूर्ये सांगुनि अपुली कथा। दीधली मजला निजआत्मता।। शेवटचे सांगणे सांगते जाले मी हरीमय। उपमा नाही गुरुच्या दये।।'

यावरून लक्षात येते की, श्री दिगंबरांनी त्याला अनुग्रह दिला असला तरी 'रुख्मादेवीवरु' हाच त्याचा प्रेरणादायी मूळ स्त्रोत आहे, गुरु आहे; असे तो स्पष्ट करतो. हे गुरुमाहात्म्य सांगताना स्वत:विषयी ओझरती माहितीही देताना दिसतो 'बापरुख्मादेव..... तर गुरु आहे'

'वाट पाहतो चातकापरी।
येई रे करुणासागरा सखया हरी।।
नाना दु:खे असती या संसारी।
उणे पाहती स्वजन, या जना प्यारा'
'तुझा अनन्य म्हणवोनी नाही मान।
भक्तीवर्म नेणो, पाहीजन।।
बळेचि करिती नींदन अवमान।
येऊनि करी, यांचे मनन।।
त्रासोनिया राहिला जीव आहे।
आर्तवाणा जाहलो, सखया पाहे।।
त्राहे त्राहे यदुराया त्राहे माते।
सर्वपरी अनन्य शरण आहे।।'
यावर उपाय म्हणून कवी स्पष्टपणे म्हणतो,
'रुक्मिणीवर सुमंत्रु जपनामास वाचे।
पुसुन रे मूळ टाको, तीव्र योगे भवाचे।।'
'रुख्मादेवीवर हा सीद्धमंत्रु।
स्मरताची नासती, सहा शत्रू।।'
आणि पुढे म्हणतो -
'अनुभव तरी नेणे, कोणी तुझ्या रतीचा।
कठिण रे पंथ आहे, निज तुझ्या गतीचा।।
सहज तो मजलात्यागी, प्राप्त जाला अनंता।
सहज हरुनि गेली, शोध संताप-चिंता।।८।।

आपल्या या 'पंथाचे असेच उल्लेख दोन-तीन ठिकाणी त्याने केले आहेत. भागवत पंथाच्या, इतर अनेक संतांच्या भूमिकेतून यांची भूमिका काहीशी वैशिष्ट्यपूर्ण म्हणूनच वेगळी वाटते. पंढरपूरचा विठ्ठल ही कुलदेवता असली तरी 'रुख्मादेवीवरु' (कृष्ण) चा अवतार म्हणून त्याचा ओढा अधिक दिसतो. 'कृष्ण दयार्णवा' असे हाकारून माधुकरी मागणारे 'हरिवरदा'कार किंवा 'रामकृष्णहरी'चा उद्घोष करणारी संतमंडळी अगदी अलीकडचे उदाहरण द्यावयाचे तर गाडगे महाराजांचे -'देवकीनंदन गोपाला' हे कीर्तनातील भजन लक्षात घेतले तर 'रुख्मादेवीवरु' ही नाममुद्रा घेण्यामागची त्याची दृष्टी सहज लक्षात येऊ शकते. त्याच्या कृष्णमहात्म्याच्या गवळणी, लावण्या, पदे, अभंग, हिंदुस्थानी पदे इ. रचनांमधील प्राधान्यता आणि तादात्म्यता यांचा सहज उलगडा होतो. त्यातील प्रतिभा आणि प्रज्ञा यांचा संगम अधिकच भावतो.

साहजिकच पंढरीच्या विठ्ठलविषयी त्यांची ओढ एक निराळा आयाम घेताना दिसते. कृष्ण-काव्यापेक्षा विठ्ठल-अभंग व रचना या जशा साध्या-सुध्या, प्रासादिक बोली-भाषेत जिव्हाळा आणि सलगी निर्माण करतात; तसेच आत्माविष्काराचे एक विलोभनीय दर्शन घडवितात. त्याचे एक उदाहरण पाहू.

'असे जरी होते विठो तुझ्या चित्ती।
तरी का गा प्रीती, लावीयली।।१।।
बांधोनि प्रीतीदोरा ठेवियले जीवा।
सोडुनि केशवा, म्हणसी जाऊ।।२।।
हा योग घडेल, सांग कणवे परी।
जीव तुजवरी, राहियला।।३।।
समर्थ गा धन्य, राजराजेश्वरा।
रूख्मादेवीवरा अंतरंग।।४।।
तसेच पुढील रचना पहा -
'केलेला प्रहार शेवटासि आला।
लौकिक जाहला। मी बा तुझा।।१।।
आता काय दाखविशी जना परी।
घेतले पंढरी। माव त्याचे।।२।।
पडोनि राहिला पहिलाची घडण।
मज म्हणति वेडा। विठो तुझा।।३।।
रुख्मादेवीवरा कोणत्याही परी।
पडलो पदरी। तुझ्या आहे।।४।।
हीन तुझ्या पडीलो पदरी।
शरण द्वारावरी। आल्यामुळे।।५।।
आता करी माझा आदिअंत गोड।





अनुक्रमणिका

पुरविते नि कोड। शेवटीचे।।६।।
आजावरी अरी। सोसोनि संसारी।
नाही या निर्धारी। पडलो उगा।।७।।
सकळा ही परी। ऐकली करुणा।
रुख्मादेवीरमणा। चरणी तुझ्या।।८।।

याउलट कृष्ण-महात्म्य रचनेतील संस्कृतप्रचुर, अनुप्रासयुक्त काहीशी शाहिरी थाटाचे हे उदाहरण -

'ललित त्रिभंगी राधार्धांगी। मदन मनोहर सुभग छबी।
गोपवेश नटनागरवर। भरूनि राहिली नयन जीवी।
स्वतंत्र तंत्रे, रमा कलत्रे, विश्वनीयंत्रे चिग्दंगे।
विशुद्ध गात्रे, परम पवित्रे माय बहिणी श्रीरंगे।'

अर्थात् कवीची भाषा शैली, तत्त्वज्ञान व इतरांचा त्यावर झालेला वा तात्कालीन इतरांचा त्याच्या शैलीवर झालेला परिणाम हा अन्य लेखाचा विषय ठरावा.

आता एकाच महत्त्वाच्या प्रश्नाचा विचार करणे आवश्यक ठरते. 'श्री परमहंस प्रव्रजाकाचार्य कृष्णानुचर स्वामी' म्हणजे निश्चित पूर्वाश्रमीची व्यक्ती कोण ? संन्यास घेतल्यानंतर पूर्वाश्रमीचे नाव मागे पडते वा पूर्वमूल्य विसरणेच अपेक्षित असते. अलिकडचे उदाहरण स्वामी विवेकानंदाचे वा पावसच्या स्वरूपानंदाचे रूप डोळ्यांसमोर आणल्यास ही गोष्ट अधिक स्पष्ट होईल. यातूनच आणखी एक प्रश्न निर्माण होतो की, इतकी उत्कृष्ट रचना करणारे, 'कृष्णानुचर स्वामी' अज्ञातच का राहिले ? त्याचे एकच संभाव्य उत्तर डोळ्यांसमोर येते की, त्यांनी आपल्या कोणत्याही रचनेत 'तुका म्हणे, नामा म्हणे, ज्ञानदेव म्हणे', अशा प्रकारे उल्लेख करण्याचे कटाक्षाने टाळलेले दिसते. मात्र 'रुख्मादेविवरु विठ्ठलु' ही नाममुद्रा घेऊन 'अज्ञातच' राहणे जाणीवपूर्वक ठरविलेले दिसते.

याशिवाय आणखी एक गूढ लक्षात आले त्याची नोंद करून ठेवण्याची गरज वाटते. मी ज्ञानदेवांच्या अभंगगाथेत 'बाप रूख्मादेविवरु' ही नाममुद्रा वापरलेल्या ज्या रचना प्रकाशित झाल्या आहेत. त्यापैकी क्वचितच रचना या नव्याने उपलब्ध होत असलेल्या गाथ्यात आहेत. म्हणजे हा गाथा एक तर सर्वत्र प्रचारात नसावा. एखाद्या मठात तो बंदिस्त होऊन पडला असावा व सर्वत्र प्रचारातील बाडात त्या उपलब्ध झाल्या नसाव्यात. पण यावरून हेही लक्षात येते की, अजून धांडोळा घेतला तर अधिक रचना उपलब्ध होणे शक्य आहे. या अज्ञात गाथ्याने अनेक प्रश्नांची उत्तरे दिली असली, तरी त्यातून हे तीन प्रश्न निर्माण होतात याची नोंद अभ्यासकांनी घेणे गरजेचे आहे. कदाचित नांदेडचे सुप्रसिद्ध विद्वान श्री. टोके - शास्त्री यांच्या हस्तलिखित संग्रहात वा घराण्याच्या परंपरेत याचा धागादोरा लागू शकेल. कारण शके १५५१ ते शके १६२४ या कालखंडातील तिघे (टोकेकर) स्वतःला 'कृष्णानुचर' असे म्हणवितात. तेव्हा पैठण, कायगाव, टोके, नांदेड या भागात अधिक तपास केल्यास काही साध्य होणे शक्य आहे; आणि हेही स्पष्ट होते की, श्री. कानडे-नगरकर यांच्या मते ११०६ पैकी फक्त ३७६च अभंग ज्ञानदेवांचे म्हणून आहेत. ते स्वीकृत आहेत, पण त्यातही 'बापरुख्मादेविवरुचे कृष्णानुचर स्वामीचे' १९३ आहेत. म्हणजे फक्त १८३ अभंगच आद्यज्ञानदेवांचे ठरतात; असे दिसते.

*सुरेश जोशी*
*संस्थापक, ऐतिहासिक वस्तु - संग्रहालय,*
*अहमदनगर.*
*दूरभाष- (०२४१) २३४४७६७*

■

# श्रीज्ञानेशांनी सजविलेली श्रीगणेशमूर्ती

डॉ. मधुसूदन बोपर्डीकर

महाराष्ट्रात सर्वत्र श्रीगणेशोत्सव नेहमीच मोठ्या उत्साहात व भावभक्तीने साजरा होतो. विद्या आणि कलांच्या ह्या देवतेची प्राणप्रतिष्ठा आणि सजावट ज्ञान, भक्ती आणि कर्मपूर्वक अतिशय कलात्मकतेने करण्यात येते. याबाबतीत युवकांच्या गणेशोत्सव मंडळांत अतिशय निरोगी स्पर्धा पहावयास मिळते. या संदर्भात ७०० वर्षापूर्वी श्रीज्ञानदेवांनी ज्ञानेश्वरीत साकार केलेली 'श्री'ची वाङ्मयी मूर्ती किती सार्थ, विश्वात्मक आणि भारतीय ज्ञानपरंपरेचे व उदात्त संस्कृतीचे दर्शन घडविणारी आहे, हे पाहणे सयुक्तिक व रंजक ठरेल असा विश्वास वाटतो.

**श्री गणेशाचे समग्र दर्शन**

भावार्थदीपिकेतील प्रारंभीच्या २० ओव्या नजरेसमोर आणल्या तर ज्ञानेशांची ही गणेशमूर्ती खरोखर ज्ञानमूर्ती व संस्कृतीमूर्ती असल्याचे ध्यानात येते. पहिल्या ओवीत वेदप्रतिपाद्य, स्वसंवेद्य, आत्मरूप, आद्य ॐ काराला ज्ञानदेव अभिवादन करतात;आणि दुसऱ्या ओवीत सकलमतिप्रकाशु गणेशु हाच परमात्मा व ॐ असल्याचे सांगतात. सच्चिदानंदरूप परमात्म्याचे ॐ हे प्रतीक असून श्रीगणेश हे त्याचे सगुण-साकार रूप आहे. हे झाले श्रीगणेशाचे निराकार, निर्विकल्प स्वरूप! हे गणेशाचे मूलभूत दर्शन आहे.

**वाङ्मयी गणेशमूर्ती**

गूढ-गहन, निर्गुण-निराकार तत्त्वावर मन एकाग्र होणे अवघड असते. म्हणून त्याच मूलतत्त्वाचे साजिरे-गोजिरे सगुण साकार रूप ज्ञानदेव ४ ते १८ ओव्यात साकार करतात. त्यांचे सर्वच अवतारकार्य ज्ञान, प्रकाश व वाङ्मय स्वरूपाचे असल्याने आपल्या वाग्यज्ञात सुरुवातीला, ज्ञानस्वरूप, देदीप्यमान आणि वाङ्मयी गणेशमूर्तीचे (शब्दब्रह्म अशेष) दर्शन ज्ञानदेव तिसऱ्या ओवीत घडवितात. त्यामुळे सहजच हजारो वर्षांची ज्ञानसाधनेची सांस्कृतिक परंपरा एका मूर्तीत पहायला मिळते. एक प्रकारे भारतीय आध्यात्मिक व सांस्कृतिक प्रदीर्घ परंपरेचे हे विश्वरूप दर्शन म्हणावे लागेल. हे वर्णन करताना श्रीगणेशाचे शरीर व त्यावर, शोभायमान होणारे अलंकार - वस्त्रे वगैरे हे सर्वच दर्शन नयनरम्य आहे.

**वाङ्मयीन रूपलावण्य**

४ ते १८ ओव्यात ज्ञानदेवांनी केलेले रूपक नितांत रूपलावण्य मिरवणारे आहे. भारतीय परंपरेतील स्मृतिग्रंथ हे गणेशाचे विविध अवयव, त्यातील काव्यपंक्ती हे हावभाव आणि त्यांचे अर्थसौंदर्य हे लावण्य आहे. १८ पुराणे ही रत्नखचित भूषणे असून त्यातील सिद्धांत ही रत्ने असून शब्दांच्या कोंदणात ती बसविली आहेत. उत्कृष्ट शब्दरचना ही रंगीत वस्त्रे व साहित्याचे तलमवस्त्र अतिशय झगझगीत आहे. काव्यनाटके म्हणजे पायातले घुंगरू असून त्यातील आशय म्हणजे घुंगरांचा किणकिण आवाज आहे. सिद्धांताची रत्ने घुंगरांवर जडविली आहेत. व्यास-वाल्मिकींच्या प्रज्ञेचा शेला कमरेभोवती आहे. तत्त्वज्ञानाची ६ दर्शने हे ६ हात असून परस्परविरोधी मतांची शस्त्रे हातात गणेशाने धारण केली आहेत. तर्काचा परशु, न्यायाचा अंकुश, ब्रह्मज्ञानाचा मोदक हातात आहे. सांख्यांचा सत्कार्यवाद हे वरदायी करकमल असून धर्मसूत्रे हा अभयदान देणारा हात आहे. परस्पर संवादांचा शुभ्रपणा दातावर विलसत आहे. ज्ञानाचा अचूक वेध घेणारे बारीक डोळे आहेत. पूर्व आणि उत्तर मीमांसेचे २ विशाल कान असून गंडस्थळातून स्त्रवणाऱ्या अमृतरूपी मदाचा रस मुनीरूपी भ्रमर चाखत आहेत. श्रुति-स्मृतींमधील विचारांची पोवळी असून, द्वैत व अद्वैताची २ गंडस्थळे आहेत. उपनिषदातील ज्ञानमकरंद म्हणजे मुकुटावरील सुगंधित फुले

आहेत. असे सर्वांगसुंदर रूप धारण करणारा ज्ञानेशांचा गणेश ज्ञानसूर्याप्रमाणे तेजाने झळाळणारा आहे.

**आदिबीज ॐकार गणेश**

शेवटच्या १९व २० व्या ओवीत श्रीगणेशाचे ओंकारात्मक अ + उ + म् अक्षरांनी घडलेले रूप चित्रदर्शीपद्धतीने डोळ्यांपुढे ज्ञानदेव उभे करतात. चरणयुगुल हा अकार, विशाल उदर हा उकार, तर मस्तक हा मकार असल्याचे सांगून ह्या तिन्ही अक्षरांच्या एकवटण्याने शब्दब्रह्म कवळले असल्याचे शेवटी सांगतात. या गणेशस्तुतीपर ओव्यांच्या आरंभी व अखेरीस विश्वात्मक देव निवृत्तिनाथ गुरूंचा निर्देश करायला ते विसरत नाहीत.

असे हे गणेशरूपाचे दर्शन सुखावणारे आहे. स्वत: ज्ञानदेव, गुरू निवृत्तिनाथ आणि आपण सर्व भक्तजन एवढेच नव्हे ; तर साक्षात् श्रीगणेश सुद्धा ह्या गणेश-स्तवनाने तृप्त झाले असणार. मला वाटते हे स्तवन ऐकून श्रीगणेश काहीसे विचारमग्न झाले आणि ज्ञानोबाला म्हणाले- बाळ योगिराज ज्ञानदेवा, तू केलेले माझे स्तवन अपूर्व असेच आहे. मी त्यामुळे प्रसन्न आहे. तरी पण तू माझे रेखाटलेले वाङ्मयीन चित्र, तू खोदलेले माझे वाङ्मय शिल्प व उभारलेली वाङ्मयी मूर्ती, मला काहीशी अपुरी वाटते. तुला शिरोधार्थ वाटणाऱ्या ग्रंथांचा व तत्त्वविचारांचा माझ्या ठायी तू चपखलपणे समावेश केलास. मात्र माझी ही मूर्ती अनंत काळपर्यंत परिपूर्ण स्वरूपात भक्तांच्या अंत:करणात ठसावी ह्यासाठी ह्या स्तवनातील अपुरेपणा मला दूर करावासा वाटतो. हे काम तूही करू शकतोस पण आत्यंतिक विनम्रवृत्तीने ते तू करणार नाहीस याची मला खात्री आहे. म्हणूनच माझ्या वर्णनातील त्रुटी दूर करण्यासाठी तुझ्या आवडत्या ओवी-वृत्तामध्ये मी जे वर्णन करणार आहे ते तुला खचित्‌च आवडणार नसले तरी स्वान्त:सुखाय व लोककल्याणार्थ ते मी करतो, ते असे -

येथ गणेश म्हणे, - बाळ ज्ञानदेव ।
साजिरे तुझे वाग्वैभव ।
जरी कवळिते संस्कृति-सौष्ठव ।
अपुरे ते - मी पूर्ण करतो ।।१।।
भावार्थदीपिका हृद्संगम ।
माझे चैतन्य मनोरम ।
अमृताहूनी मधुरिम ।
लावण्य-रत्न-भांडार शारदेचे ।।२।।
अनुभवामृत सिंहासन ।
अध्यात्माचे अधिष्ठान ।
चिद्विलासाचे स्फुरण ।
विश्वात्मक चिरंतन ।।३।।
ज्ञान आणि विज्ञान ।
चांगदेव पासष्टीचे रसायन ।
पाठीस महिरप शोभायमान ।
विराजे विलोभनीय ।।४।।
हरिपाठ माझे हृदय ।
अभंग अनंत सहृदय ।
भावोन्मेष उधळती तेजोमय ।
रत्नखचित निरांजने ।।५।।
ऐकोनी देव-वाणी ।
संजीवनी वरदायिनी ।
मूक होऊन अमृत-वाणी ।
ज्ञानदेवो सुखिया झाला ।।६।

**डॉ. मधुसूदन बोपर्डीकर**
*'स्वरानंद' प्राध्यापक कॉलनी, अहमदनगर- ४१४००१*
*दूरभाष: (०२४१) २४२६५७६*

■

## उल्लेखनीय सहकार्य

महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या ग्रंथालयातील एक ग्रंथपाल श्रीमती मीनाक्षी केळकर यांनी ग्रंथालयासाठी रु. ५०,०००/- ची देणगी जमा केली.

पुण्यातील अहिल्यादेवी हायस्कूलमधील अध्यापकांनी प्रत्येकी रु. २५०/- देऊन यासाठी श्रीमती केळकर यांना सहकार्य केले.

या सक्रीय सहकार्याबद्दल श्रीमती मीनाक्षी केळकर यांचे परिषदेच्या वतीने अभिनंदन!

अनंत जोशी
कार्यवाह, ग्रंथालय विभाग

# ‘कडकडोनी वीज निमाली ’- साधार विवेचन

प्रा. सुजाता शेणई

‘मोतियांचा चुरा फेकिला अंबरी । विजूचिया परी कीळ झाले ॥’ हा अलौकिक प्रतिभेचा अध्यात्मपातळीवरचा अभंग लिहिणारी थोर संत कवयित्री मुक्ताबाई होय. ज्ञानेश्वरभगिनी ही मुक्ताबाईची प्रथम ओळख आहे. ज्ञानेश्वरांची काव्यशक्ती आणि तत्त्वज्ञानाची बैठक ही स्तिमित करणारी आहे ; यात शंकाच नाही; पण मुक्ताबाई ही अध्यात्माच्या क्षेत्रातील अद्भुत विद्युल्लता आहे. हे लेखिका डॉ. केतकी मोडक यांनी त्यांच्या ‘कडकडोनि वीज निमाली ठायींचे ठायी’, ‘संत मुक्ताबाई व्यक्ती आणि वाङ्मय’ या पुस्तकात साधार विवेचनातून पटवून दिले आहे.

मुक्ताबाईच्या जीवनकार्याचा परिचय एकूण चार विभागात करून दिला आहे. मुक्ताबाईचे चरित्र, मुक्ताबाईच्या प्रभावळीतील संत, मुक्ताबाईचे समग्र वाङ्मय आणि मुक्ताबाई एक की दोन; या प्रश्नाचा खोलवर घेतलेला मागोवा अशा चार भागात त्याचे वर्गीकरण केले आहे. मुक्ताबाईवर आजवर लेखन झाले नाही असे नाही, परंतु ते त्रोटक आणि प्रचालित आख्यायिका यांचा आधार घेऊन झाले आहे. डॉ.केतकी मोडक यांनी संशोधनाची जोड देऊन (लेखिकेचा पीएच.डी.चा संशोधनाचा विषय ‘मराठी साहित्यातील नाथप्रतिमादित ‘सोऽहम् साधना’ असा आहे.) मुक्ताबाईच्या चरित्राचा, अलक्षित अभंगांचा, मुक्ताबाई- गोरक्षनाथ भेट या आख्यायिकेचा, मुक्ताबाई- चांगदेव यांच्यातील अनुबंधाचा, मुक्ताबाई- वटेश्वर यांच्या आध्यात्मिक नात्याचा उलगडा अतिशय सोप्या भाषेत करून दिला आहे. लेखिकेने मुक्ताबाई ही कार्यकर्तृत्व संपन्न अशी स्वतंत्र अस्तित्वाची चित्कला मुक्ताबाई होती; हे संशोधन दृष्टीतून सिद्ध करून दाखविले आहे.

‘मुक्ताबाई आणि गोरक्षनाथ भेट’ हा मुक्ताईच्या जीवनातील अत्युच्च क्षण आहे की, ज्यामुळे मुक्ताई आमूलाग्र बदलते. ‘मुक्ताईला ही भेट कशी मिळाली?’ या ज्ञानेश्वरांच्या प्रश्नाला मुक्ताई सहज उत्तर देते ‘ओळखिले अवीट आपुलेपण’ लहानपणापासून जिज्ञासू, आत्मविश्वासू, परखड आणि स्पष्ट असणाऱ्या मुक्ताईला नामदेवांचे मडके कच्चे का पक्के? हा प्रश्न पडतो. चौदा विद्या आणि चौसष्ट कला यात पारंगत असणारे चौदाशे वर्षाचे चांगदेव मुक्ताईला ‘गुरुमाऊली’ करतात ; आणि ‘अज्ञान केले दुरी मुक्ताईने’ असे म्हणत मुक्ताईच्या क्षेत्रातला अधिकार मान्य करतात. मुक्ताई ही भावंडामध्ये लहान पण परिस्थितीमुळे अकाली प्रौढ झालेली मुक्ताई - या भावंडाची माय बनते. या ‘माय भूमिकेतून’ ती ज्ञानेश्वर, निवृत्तिनाथ आणि सोपानदेवांना पारमार्थिक ज्ञानाची कवडे उघडून दाखविते.

संतत्वाची पातळी गाठलेल्या मुक्ताईला आणि तिच्या भावंडांना लोकनिंदेला तोंड द्यावे लागे. या टीकेला कंटाळून ज्ञानेश्वरांनी ताटीत स्वतःला बंदिस्त करून घेतले; ही आख्यायिका सर्वश्रुत आहे. यातून मुक्ताईचे ‘ताटीचे-अभंग’ निर्माण झाले. पण ही आख्यायिका आणि ज्ञानेश्वरांनी स्वतःला बंदिस्त करून घेणे हे लेखिकेस मान्य नाही. आख्यायिका आणि वस्तुस्थिती यात तफावत आहे. तत्कालीन सामाजिक परिस्थितीत शब्दपांडित्याच्या जोरावर ढोंगी साधू सामान्य माणसांना फसवत. हा अनुभव ज्ञानेश्वरांनी घेतला. त्यामुळे त्यांचे मन उद्विग्न झाले. ज्ञानेश्वरांनी स्वतःच्या मनाशी निर्णय घेतला असावा की, आपण आत्मस्थितीत रहावे. म्हणून त्यांनी स्वतःला बंदिस्त केले. ज्ञानाची कवाडे अशा रीतीने मिटून घेणे हे जनसामान्यांच्या दृष्टीने हितावह नाही ! हे जनकल्याणाची तळमळ बाळगणाऱ्या मुक्ताबाईला पटत नाही. म्हणून

ज्ञानेश्वरांना समजून सांगण्यासाठी 'ताटीच्या- अभंगाची' निर्मिती झाली. मुक्ताबाईंच्या अभंगाबरोबरच 'ज्ञानबोध' ग्रंथ ही मुक्ताईची अपूर्व ग्रंथसंपदा होय. मुक्ताई आणि निवृत्तिनाथ यांच्यातील संवाद हे या ग्रंथाचे बाह्यरूप; तर ब्रह्म आणि माया यासंबधीचे मुक्ताईचे आकलन हा ग्रंथाचा आशय आहे. मुक्ताईचे चरित्र, मुक्ताईची प्रभावळ, मुक्ताईचे वाङ्मय, मुक्ताईचे संकलित आणि अलक्षित अभंग मुक्ताईच्या संदर्भात उपस्थित असलेल्या आणि निर्माण होऊ शकणाऱ्या प्रश्नांचे साधार, विवेचन; चिकीत्सक आणि सखोल अभ्यासातून काढलेले निष्कर्ष; ही या पुस्तकाची वैशिष्ट्ये आहेत.

डॉ.केतकी मोडक मुक्ताईच्या संदर्भात निर्माण झालेल्या प्रश्नांच्या मुळाशी जातात. त्याचे उत्तर देण्याचा साधार प्रयत्न करतात आणि हे करताना वाचकांना विश्वासात घेतले आहे. वैचारिक असूनही क्लिष्टता येत नाही. प्रस्तुत पुस्तकात जिज्ञासू वृत्तीने प्रश्न विचारणारी लहानशी मुक्ताबाई ते सद्गुरूंनी विचारलेल्या प्रश्नांना समाधानकारक उत्तर देणारी प्रगल्भ मुक्ताबाई असा तिचा प्रवास आहे. हा प्रवास सलग एका चरित्रपटासारखा वाचकांसमोर उभा राहतो. गोरक्षशिष्या मुक्ताबाई आणि ज्ञानेश्वरभगिनी मुक्ताबाई एक की दोन या प्रश्नाचा निष्कर्ष - दोन्ही मुक्ताई म्हणजे एकच आहे हे लेखिकेने पटवून दिले आहे.

अभ्यासूवृत्तीने केलेले लेखन पुढील संशोधकांना निश्चित उपयोगी पडेल यात शंका नाही.

*प्रा.सुजाता शेणई*
*ए-१ प्लॅट नं.३ सुंदर रचना विठ्ठलनगर, वडगाव बुद्रुक*
*पुणे-४११०५१. दूरभाष.२४३४१४६६*

संत मुक्ताबाई : व्यक्ति आणि वाङ्मय
डॉ. केतकी मोडक
प्रकाशक
महेश मोडक
ग्रेस प्लॅट नं.१, श्रीराम अपार्टमेंटस, २४३/८,
शुक्रवार पेठ, पुणे - ४११००२ दूरभाष.२४४६०५२०

■

## २० वे बालकुमार साहित्य साहित्य संमेलन

**दत्ता श्री. टोळ**

*अखिल भारतीय मराठी बालकुमार साहित्य संस्थेचे २० वे अधिवेशन डिसेंबर २००६ मध्ये विजया जहागिरदार यांच्या अध्यक्षेतेखाली दिमाखदारपणे संपन्न झाले.*

*विजया जहागिरदार यांनी अध्यक्षीय भाषणात बालसाहित्याची सोपी व्याख्या सांगितली. 'हॅरी पॉटर'वर त्यांनी घणघाती टीका केली. पुढील काळात साक्षरता अभियान राबवण्याचे जाहीर केले. मावळत्या अध्यक्षा डॉ.लीला दीक्षित ह्यांनी अध्यक्षपदाची सूत्रे प्रदान करताना बालसाहित्याला अधिक चांगले दिवस येत असल्याबद्दल समाधान व्यक्त केले.*

*नाशिक आकाशवाणीचे केंद्रप्रमुख कवी उत्तम कोळगावकर ह्यांनी प्रसारमाध्यमे बालसाहित्याची दखल घेतील अशी अपेक्षा व्यक्त केली. विजया वाड, मुकुंद तेलिचिरी ह्यांचे उत्कृष्ठ कथाकथन, मुलांचेच कविसंमेलन, योगेश सोमण यांचे 'बालशिवाजी' नाट्य. ही संमेलनाची वैशिष्ट्ये ठरली. भाषेच्या खेळीचे दालन लहानाप्रमाणे प्रौढांना आकर्षित करत होते. ज्ञानप्रबोधिनीचा सिद्धार्थ देशमाने ह्याच्या हस्ते संमेलनाचे उद्घाटन झाले तर अभिनेते राहूल सोलापूरकर ह्यांनी त्यांच्या खुसखुशीत व प्रबोधनात्मक भाषणातून सर्वांना मंत्रमुग्ध केले. पाठ्यपुस्तकातील बालसाहित्य परिसंवादात डॉ.न.म.जोशी ह्यांनी समतोल भूमिका घेऊन विचार व्यक्त केले. नेटक्या आयोजनाचा उत्तम वस्तुपाठ म्हणून ह्या संमेलनाचा उल्लेख करावा लागेल. यापुढील संमेलन - आयोजक त्याचा कित्ता गिरवतील ही अपेक्षा*

# 'तुका वैकुंठासी गेला !'

डॉ.(सौ.) सुप्रिया अत्रे

तुकाराम महाराजांच्या सदेह वैकुंठगमनाचे गूढ अभ्यासकांना असले तरी भाविकांच्या मनात तिळमात्र शंका नाही. तुकोबा चैतन्यसंप्रदायाशी निगडीत होते. त्यांनी आपला देह योगसामर्थ्याने पंचत्वात विलीन केला. जीवनभराच्या भक्ती साधनेने त्यांनी आपल्या देहबुद्धीचे मरण पाहिले. नंतर शुद्धदेहाने वैकुंठाला गेले. या आध्यात्मिक प्रवासाचा धांडोळा घेणारे ग्रंथपरीक्षण.

नुकताच प्रकाशित झालेला डॉ.सौ.शोभा घोलप आणि सौ.रजनी पतकी यांनी लिहिलेला 'तुका वैकुंठासी गेला' हा ग्रंथ वाचनात आला. शीर्षकावरून असे वाटले होते की, संत तुकारामांच्या सदेह वैकुंठागमनाची हकीकत या पुस्तकात कथन केली असेल. परंतु पुस्तक उघडताच सौ.कल्याणीताई नामजोशी, ह.भ.प.विवेकानंद वासकर, डॉ.सदानंद मोरे, डॉ.विजय भटकर इत्यादींची प्रस्तावना किंवा मनोगते वाचली आणि लेखिकांची या पुस्तकामागची भूमिका वाचण्यापूर्वीच त्यातील गहनता ध्यानात आली. संतसाहित्याची आवड असूनही इतक्या खोलवर जाऊन एका विशिष्ट घटनेवर अभ्यासपूर्ण विवेचन फारसे वाचनात आले नव्हते. मात्र या पुस्तकाच्या वाचनाने तो आनंद दिला. किंबहुना त्या विषयाचा खोलवर जाऊन अभ्यास करण्याची प्रेरणा दिली.

'तुका वैकुंठासी गेला' हा अगदी वेगळ्या प्रकारचा ग्रंथ आहे. त्यात केवळ तुकारामांच्या वैकुंठगमनाचे कारण त्यांची भक्ती, उपासना एवढेच नाही; तर साधनेचे स्वरूप व त्याचे पर्यवसान यांचा मागोवा घेण्याचा प्रयत्न केला आहे. या ग्रंथाचा आवाका उपनिषदांपासून तो आधुनिक काळातील संत महतांपर्यंत आहे. लेखिकांनी आपली या ग्रंथामागची भूमिका सांगताना म्हटले आहे की, 'तुकारामांच्या जीवनातील एक विशेष पैलू म्हणजे त्यांचे सदेह वैकुंठागमन, अनेक अभ्यासकांनी त्या संदर्भात आपली मते नोंदविली आहेत. परंतु येथे तुकारामांच्या योगविषयक अनुभूतीचा अभ्यास करण्याचा प्रयत्न केला आहे. त्यांच्या अभंगातील काही विशेष शब्द योगाच्या परिभाषेतील शब्दानुसार अर्थ घेतला तर जास्त स्पष्ट होतात. त्यानुसार विचार करून तुकारामांच्या आध्यात्मिक चरित्राचा क्रियायोग, हठयोग, अष्टांगयोग इत्यादीचे संदर्भ यांचा मागोवा घेण्याचा प्रयत्न केला आहे.

ज्यावेळी हा ग्रंथ वाचला तेव्हा या दोन लेखिकांच्याही अभ्यासाची ,व्यासंगाची गहनता ध्यानात आली. या एका संकल्पनेसाठी त्यांनी जेजे ग्रंथ हाताळले आहेत, अभ्यासले आहेत; ते सारे या विषयाचे गाढपण सिद्ध करणारे आहे.

संत तुकारामांचे अध्यात्मिक चरित्र, तुकारामविषयक अभ्यासाचा मागोवा, ज्ञानोबा ते विठोबा यांचे योगपर अभंग, संतश्रेष्ठ तुकारामांच्या अभंगातून आढळणारे क्रियायोग, अष्टांगयोग, हठयोग यांचे संदर्भ, योगवासिष्ठ्य आणि तुकारामांची विदेही अवस्था, संत तुकारामांची योगानुभूती संतश्रेष्ठ तुकाराम महाराजांचे सदेह वैकुंठगमन इत्यादी विषयांच्या विस्तारातून या ग्रंथाचा प्रवास झाला आहे.

संत तुकारामांचा कालखंड हा इ.स.१६०८ ते इ. स. १६५०. देहू या गावातच त्यांचे सारे जीवन आकाराला आले. सांसारिक तापाने आपल्यासारखाच त्यांनाही भोग सुटला नाही. मात्र त्याने खचून न जाता 'बरे झाले देवा निघाले दिवाळे' अशी मानसिकता ठेवून त्या भोगावर मात करण्याचा त्यांनी प्रयत्न केला आहे. 'बुडती हे जन न देखवे डोळा। येतो कळवळा म्हणऊन।' हे त्यांच्या जीवनाचे मर्म होते. त्यांच्या आध्यात्मिक चरित्राचे स्पष्टीकरण करताना लेखिका म्हणतात की, 'त्यांनी स्व-ज्ञान कसे घेतले व जो विठ्ठलरूपाने सर्वांच्या अंतर्यामी व चराचरी वास करून 'स्व' जाण देतो त्याचा भाव त्यांनी कसा प्राप्त करून घेतला याचे विवेचन आहे.'

संसारतापाने मन पोळले असतानाही त्यांनी ईश्वरोपासना सोडली नाही. भंडारा डोंगरावर जाऊन ते ईश्वरचिंतनात निमग्न झाले. अनेक ग्रंथ त्यांच्या वाचनात आले. स्वप्नात सदगुरु-दर्शन होऊन त्यांच्या अमृतवाणीतून 'रामकृष्ण हरि' हा मंत्र

त्यांना मिळाला. या स्वप्नदर्शनाचे विवरण या लेखिकांनी अतिशय समर्पकपणे येथे केले आहे. तुकारामांना झालेला साक्षात्कार सांगताना त्यांनी म्हटले आहे. 'पंढरी म्हणजे देह, पांडुरंग म्हणजे आत्मा, पुंडलिक म्हणजे प्रेम, स्वभाव म्हणजे चंद्रभागा, वीट म्हणजे विवेक, रुक्मिणी व राही म्हणजे दया व क्षमा, गरुड व हनुमंत म्हणजे बुद्धी व वैराग्य होय. या पंढरीत तुकाराम विसावले होते. नामसाधना, सत्संग, देह, मन, शुद्धी, यज्ञीय कर्म, लौकिकांविषयी वैराग्य, आत्यंतिक तळमळ यातून तुकारामांचा साक्षात्कार सिद्ध झालेला दिसतो.

आपल्या अभंगांतून तुकारामांनी अशा प्रकारच्या साधनेचे मार्गदर्शन केले आहे. आपल्या साधनेतून त्यांनी सर्व चराचरात ईश्वर पाहिला. सारे आसमंत विठ्ठलरूप झाले. त्यानंतर साहजिकच देहवासना उरत नाही. याचा प्रत्यय त्यांना आला होता. फाल्गुन वद्य २ शके १५७२ ह्या पुण्यदिवशी या अनुभवाचा कळस झाला. संत तुकाराम सदेह वैकुंठाला गेले. 'सत्-चित्-आनंद' रुपी परमेश्वराशी ते एकरूप झाले. हा त्यांचा 'स्व-भाव' होता. त्यांचा जीवभाव ते स्वभाव ही यात्रा म्हणजेच आध्यात्मिक जीवन. या आध्यात्मिक जीवनाचा आजवर झालेल्या अभ्यासाचा मागोवाही या ग्रंथात लेखिकांनी घेतला आहे. अनेक विद्वानांनी या सदेह वैकुंठगमनाबद्दल आपल्या अभ्यासातून मते नोंदविली आहेत. अगदी तुकारामांच्या समकालीनां-पासून तो नुकत्याच लिहिलेल्या त्यांच्यावरील पुस्तकांतून आलेल्या या विषयावरील नोंदीचाही विचार या लेखिकांनी केला आहे. या सर्वांमध्ये एक गोष्ट जाणवते की या लेखिकांनी तुकारामाचे सदेह वैकुंठाला जाणे-हे अचानक गुप्त होणे, इंद्रायणीत बुडी मारणे इथपासून तो योगाच्या सहाय्याने सूक्ष्म देह होणे इथपर्यंत अनेक शक्यतांचा विचार केला आहे. संत तुकारामांनीही आपल्या अभंगात योगावर अनेक अभंग लिहिले आहेत. त्यामुळे ज्ञानदेवांपासून अनेक संतांच्या अभंगातील योगविचार या पुस्तकात व्यक्त केले आहेत. त्यांच्या आधारे उच्चतर भक्तीचे माहात्म्य तुकारामांना किती होते याचे स्पष्टीकरण मिळते.

भारतीय माणसांची जीवनपद्धती ही अनेक समृद्ध अशा ग्रंथातून मांडलेल्या विचारसरणीवर आधारित आहे. या ग्रंथातून जीवमात्रांच्या अधिभौतिक, आध्यात्मिक व अधिवैदिक दृष्टीने विचार करून उन्नतीचा मार्ग कसा अनुसरता येईल ते सांगितले आहे. या मार्गात योगाचे स्थान हे अव्वल असल्याने क्रियायोग, अष्टांगयोग, हठयोग, यांच्या माध्यमातून साधनेच्या द्वारे ते साध्य केले जाते. या सर्व योगप्रकारांची माहिती या ग्रंथात विस्ताराने दिली असून संत तुकारामांच्या अभंगातून अष्टांगयोगाचे संदर्भ कसे येतात ते सोदाहरण सांगितले आहे.

योगवासिष्ठ्य हा एक श्रेष्ठ व मान्यताप्राप्त ग्रंथ व संत तुकारामांचे विचार यात खूपच साम्य आढळते; म्हणून या ग्रंथात योगवासिष्ठ्याचाही परामर्श घेतला आहे. ग्रंथाच्या शेवटी 'सदेह वैकुंठागमन' या विषयावर उपासनापरंपरेतील उपासकांच्या प्रगतीचे टप्पे व विविध ग्रंथामधून आलेले संदर्भ देत देत संत तुकारामांचे सदेह वैकुंठागमन कसे शक्य आहे हे समजावून दिलेले आहे. त्यात लेखिका स्पष्ट करतात की तुकारामांचा भक्ती व योगाचा अधिकार लक्षात घेता त्यांना अंतिम क्षणी विठ्ठलाचे दर्शन झाले यात शंका नाही. प्रकाशमय देहाचा अनुभव प्रकाशमय स्वरूपातच येऊ शकतो. त्यामुळे अंतिम क्षणी तुकारामांनी आपला स्थूल देह प्रकाशमय करून पांडुरंगाच्या प्रकाशमय रुपाबरोबर ते प्रस्थान करते झाले. या संपूर्ण ग्रंथातून या दोन्ही लेखिकांनी वरील विधानाच्या पुष्ट्यर्थ अनेक संदर्भ देत देत अतिशय समर्थपणे विवेचन केले आहे.

एक उत्तम असा संदर्भग्रंथ म्हणून हा ग्रंथ जरी उपयोगी पडला; तरी एक गोष्ट नक्की की सामान्य माणसाच्या आकलनशक्तीला ताण देणारा आहे. अत्यंत सोप्या भाषेत त्यांनी विवेचन केले असले तरी ज्यांना योगाची गोडी आहे, ज्यांनी प्राचीन ग्रंथाचे वाचन केले आहे. त्यांना हा ग्रंथ समजणे अधिक सोपे जाईल. असे असूनही या दोन्ही लेखिकांनी जो उपक्रम केला आहे तो नक्कीच त्यांच्या व्यासंगी वृत्तीचे द्योतक आहे. सुप्रसिद्ध वैज्ञानिक डॉ. विजय भटकर यांनी पुरस्कारात 'जीव, जगत व ईश्वर' या त्रिपुटींच्या संदर्भातील त्यांचे स्पष्टीकरण मांडले असून या ग्रंथाचे त्यांना वाटलेले महत्त्वही विशद केले आहे. नामवंतांचा आशीर्वाद लाभलेला हा ग्रंथ गीताधर्म मंडळाने प्रकाशित केला असून साहित्याचे अभ्यासक व मार्गदर्शक कै.डॉ.हे.वि.इनामदार यांना अर्पण केला आहे. परिशिष्टात योगसंदर्भातील ग्रंथांतर्गत वचने दिली आहेत. लेख आणि संदर्भ ग्रंथांची

यादी दिली आहे ती पाहता आपल्या निश्चितच ध्यानात येईल की डॉ.सौ.रजनी पतकी व डॉ.सौ.शोभा घोलप यांनी अभ्यासाच्या वाटेने जात जात एक अपूर्व ग्रंथ वाचकांच्या हाती देऊन सत्कार्यच केले आहे. वाचनीय परीक्षणीय व मननीय ग्रंथाबद्दल मनापासून अभिनंदन !

*डॉ.सौ.सुप्रिया अत्रे*

*२, 'सीता - सदन' २४ गिरीजा सोसायटी, एस.एन्.डी.टी कॉलेजजवळ पुणे- ४११०३८. दूरभाष- २५४३०४१२*

तुका वैकुंठासी गेला

डॉ.सौ.शोभा घोलप / डॉ. सौ. रजनी पत्की

'दत्त' गरवारे हायस्कूल शेजारी, डेक्कन पोलिस स्टेशनसमोर प्रभात रोड, डेक्कन जिमखाना, पुणे - ४

प्रकाशक

गीता धर्म मंडळ

सदाशिव पेठ, पुणे - ४११०३०

■

## 'न्यायमूर्ती महादेव गोविंद रानडे : व्यक्ती व न्यायाधीश'- न्या.प्र.ना.बेहेरे

एका न्यायाधीशांच्या भूमिकेतून मी न्यायमूर्ती रानडे यांचे व्यक्तिमत्व व त्यांची न्यायप्रियता यांचेविषयी सांगणार आहे. हिंदुस्थान देशामधील एक थोर विचारवंत, देशाचा अर्थशास्त्रामधील जनक, इतिहासकार, समाजसुधारक असा न्या.रानडे यांचा लौकिक अजूनही आहे. पण त्यासंबधी जास्त न बोलता व्याख्यानांच्या विषयाला धरूनच त्यांची माहिती सांगाविशी वाटते.

न्यायमूर्ति रानडे यांच्या पुनर्विवाहित पत्नी कै.रमाबाई या विवाहाच्या वेळेस केवळ ११ वर्षाच्या होत्या. त्यांच्यात आणि श्री.रानडे यांच्या वयात २० वर्षाचे अंतर होते. रमाबाईचे शिक्षण अजिबात झालेले नव्हते. आणि श्री.रानडे तर विद्याविभूषित ! त्या काळामधील वर्ग १ चे न्यायाधीश. पती-पत्नींच्या शरीरयष्टीमध्ये खूपच फरक. असे असून सुद्धा न्या.रानडे यांचा मोठेपणा हा की त्यांनी त्यांच्या पत्नीला सन्मानाने, अगदी शेवटपर्यत म्हणजे वैवाहिक आयुष्याची २७ वर्षे वागविले. लग्नाच्या दुसऱ्या दिवसापासून रात्रीचे दोन तास कै.रमाबाईंना त्यांनी श्री.गणेशापासून शिकविले व फार काय इंग्रजी भाषेकडे सुद्धा पत्नीचे दुर्लक्ष होणार नाही हे आवर्जून पाहिले. त्यामुळे व्यवहारामध्ये कै.रमाबाईंनी इंग्रजी भाषेचा बाऊ कुठे होऊ दिला नाही. न्या.रानडे यांनी गृहस्थाश्रम पूर्णपणे पाळला. चारित्र्यावर कोठेही ओरखडा उठू दिला नाही. सभा, संमेलने परिषदा यामध्ये रमाबाई सतत न्या.रानडे यांचे बरोबर असत. उभयतां संसारात पूर्ण समरस झाले होते. दोघांच्या होणाऱ्या आजारपणात परस्परांनी एकमेकांची सेवाही केली होती,

न्या.रानडे हे पितृभक्त होते. पित्याने सांगितलेली कौटुंबिक व्यवस्था कटाक्षाने पाळता येईल. याच्याकडे त्यांनी कटाक्षाने पाहिले. त्यांचे वडील दुराग्रही होते. अवाजवी अपेक्षा करणारे होते. वडिलांनी केलेल्या काही आज्ञा- विशेषतः संसारामधील - चुकीच्या असल्या तरी त्या आज्ञांचे पालन न्या.रानडे यांनी पित्यांचा शब्द मोडू नये म्हणून केले. हे जितके खरे होते तितकेच हे सुद्धा आवर्जून सांगावयास हवे की, नोकरीच्या कर्तव्यांमध्ये त्यांनी आपल्या वडिलांना अजिबात ढवळाढवळ करू दिली नाही. फार काय, वडिलांना त्यांनी चांगलीच समजही दिली होती. या त्यांच्या दोन्ही अंगांकडे पाहिले तर न्या.रानडे यांचा थोरपणा दिसून येतो. मिळालेले उच्च पद हे समाजाचे हित साधण्याकरिता ईश्वरशक्तीने दिलेले आहे. तेव्हा त्याचा उपयोग वैयक्तिक लाभाकरता कधीही घेणे नाही असा निग्रह त्यांचा शेवटपर्यंत होता.

न्यायाधीश म्हणून त्यांची कारकीर्द, मुंबई उच्च-न्यायालयाचे न्यायमूर्ती म्हणून विशेष गाजली. मुन्सफ म्हणून केलेल्या कामापेक्षा मुंबईच्या इंग्रजी सत्तेने त्यांना न्यायाधीश करू नये असे १८९०- ९१मध्ये ठरविले होते. परंतु खुद्द राणी व्हिक्टोरीयाने श्री.रानडे यांच्या बुद्धिमत्तेचे चीज व्हावे म्हणून मुंबई उच्च न्यायालयाचे न्यायमूर्ती म्हणून त्यांना बढती दिली. आयुष्याच्या शेवटपर्यंत १६ जाने.१९०१ पर्यंत त्यांनी न्यायमूर्ती म्हणून ७-८ वर्षे काम पाहिले. हिंदूकायदा, बदनामी संबधीचा कायदा यावरील त्यांची निकालपत्रे विशेष गाजली. त्यांचे सहाध्ययी असलेल्या इंग्रज न्यायमूर्तींनी सुद्धा त्यांच्या कामाची व त्यांनी दिलेल्या मदतीची प्रशंसाच केली होती.

*(म.सा.प.चे विश्वस्त अध्यक्ष न्या.प्रतापराव बेहरे यांनी न्या.रानडे यांच्या १६५ व्या जयंतीनिमित्त दिलेले भाषण)*

■

# महाभारतातील स्त्रियांची समाज विकासातील भूमिका

डॉ.भा.व्यं.गिरीधारी

संस्कृत साहित्यातील स्त्रियांची चित्रणे कर्तृत्ववान आणि बुद्धिवान म्हणूनच आहेत. त्यांच्यात आत्मविश्वास आणि स्वावलंबन आढळते. त्यांच्यात स्वतंत्र व्यक्तिमत्त्वाचा आणि प्रतिभावंत जागृतीचा साक्षात्कार घडतो.

स्वाभाविकच प्राचीन संस्कृत साहित्यातील स्त्रियांची समाज विकासोन्मुख भूमिका पुरोगामी जाणवते. म्हणूनच या भूमिकेला महत्त्व आहे.

प्राचीन संस्कृत वाङ्मयातील गार्गी-मैत्रेयी या स्त्रियांनी प्रज्ञावंतांशी केलेल्या तात्त्विक चर्चेवरून, संवादावरून त्यांच्या बौद्धिक प्रगल्भतेची कल्पना येऊ शकते. लोपामुद्रा घोषा इत्यादी सारख्या वेदकालीन स्त्रिया लेखिका होत्या. ऋग्वेदातील काही सूक्तांचे कर्तेपणही त्यांच्याकडे जाते.

**महाभारतातील स्त्रिया**

महाभारतासारख्या आर्ष महाकाव्यातील स्त्रियांच्या जीवनचरित्र कार्यात समाजाच्या विकासाला अनुकूल अशा स्थित्यंतराचा प्रत्यय येतो. अशा विदुषी आणि प्रवक्त्या स्त्रिया महाभारतातील गाजलेल्या व्यक्तिरेखा आहेत.

सुलभा आणि जनमेजयाच्या संवादात स्त्री- पुरुष यामधील अभेदाची तात्त्विक कल्पना अतिशय सोप्या रीतीने मांडलेली आहे. तिने या संभापणात-संवादात जनमेजयावर मात केली.

**उपाख्यानातील स्त्रिया**

महाभारतातील एका उपाख्यानाचा कलात्मक आविष्कार म्हणून कविकुलगुरू कालिदासाच्या 'अभिज्ञान शाकुंतलम्' चा उल्लेख करावा लागतो. या 'काव्येपु नाटकम् रम्यम्' चा एक आदर्श उदाहरण म्हणून विचार करता येईल. कालिदासासारख्या ललित लेखकाला या नाटकाच्या निमित्ताने जणू कलावंतांच्या स्वातंत्र्याची सनद मिळाली आहे. या उपाख्यानाची काव्यानुकूलता जोखून कालिदासाने आपल्या प्रतिभाबलाने एक समर्थ नाट्यकृती निर्माण केली आहे.

महाभारतातील मूळ उपाख्यानात राजा दुष्यंत एका अर्थाने दोषी ठरतो. त्याला शकुंतलेशी केलेल्या गांधर्व विवाहाचे स्मरण होण्यासाठी आकाशवाणी व्हावी लागते. पण कालिदासाने आपल्या नाटकात दुष्यंताला विस्मरण होण्यामागे भेटीत दिलेली खुणेची अंगठी हरविल्यामुळे हे सगळे विपरित घडले असे चित्रित केले त्यामुळे राजा दुष्यंत व शंकुतला यांच्या प्रेमाला उजळा मिळालेला आहे. उत्कट प्रेमाची अभिव्यक्ती यातून होते. याचा अर्थ महाभारतातील चित्रणाप्रमाणे कालिदासाच्या अभिज्ञान शाकुंतल नाटकात 'शकुंतला' ही असहाय्य स्त्री राहिलेली नाही. तर ती उत्कट प्रणयिनीच्या रूपात समोर येते. या ठिकाणी गांधर्व अथवा प्रेमविवाह पद्धतीचे समर्थन या प्रसंगाच्या निमित्ताने होते. मला वाटते समाजविकासाची किंवा सामाजिक परिवर्तनाची चाहूल या उजागरपणे साजऱ्या झालेल्या दुष्यंत-शंकुतलेच्या प्रेमविवाहात लागते. राजेशाही आणि सत्तेच्या कारभारात बल आणि संपतीच्या बळावर स्त्रियांवर स्त्रीधन म्हणून हक्क प्राप्त करून घेता येत असे. त्याकाळात प्रणयाराधनेला महत्त्व देऊन शकुंतलेने प्रेमविवाहाची महती जणू समाजाला पटवून दिली. कालिदासाने प्रेमविवाहाच्या पुरस्काराची ही नांदी केली आहे.

**देवयानी-शर्मिष्ठा**

महाभारतातील कच, ययाती, देवयानी, शर्मिष्ठा या उपाख्यानाचे मोल काव्यानुकूलता आणि कलात्मक अभिव्यक्ती म्हणून विशेष आहे. वस्तुत: महाभारत हे आख्यान उपाख्यानांनी व्याप्त महाकाव्य आहे; म्हणूनच त्याला अनेक उपाख्यानांचे महाकाव्य (Episodic Epic) म्हटले जाते. या उपख्यानातील स्त्रियांची चरित्रे लक्ष्यवेधी आहेत. त्यांचा समाजाच्या विकासातील सहभाग आणि भूमिका महत्त्वाची म्हणून प्रस्तुत ठिकाणी अभ्यासण्याजोगी आहे. जसे कालिदासाच्या (दुष्यन्त) 'शकुंतले' चे उदाहरण आपण विचारात घेतो; त्याचप्रमाणे दमयंती, देवयानी, शर्मिष्ठा, विदुला, अंबा, प्रमद्वरा यांचीही उदाहरणे घेता येतील. त्यांच्या व्यक्तिरेखा आणि जीवनातील घटना, प्रसंग तत्कालीन समाजस्थितीला स्थित्यंतराकडे वळविणारे

आहेत.

शर्मिष्ठा केवळ देवयानीची दासी म्हणून राहू इच्छित नाही. तिला केवळ एका राजाची, सत्ताधीशाची भोगदासी म्हणून जगायचे नाही. तेवढ्यासाठी ती राजा ययातीशी अकृत्रिम उत्कट प्रेमाची सलगी करते. त्याच्या भावना जाणून प्रतिसाद देते. तिच्या पोटी जन्मलेल्या 'पुरू'ला न्याय मिळवून देते.त्याला पुढे राजा होण्याचा सन्मान मिळतो. एवढेच नाही तर याच पुरुराजापासून पुढे कुरु वंश ओळखला जातो. केवळ अंत:पुरातील दासीचे जिणे तिने नाकारले आहे. देवयानीच्या 'दैत्याचे गुरू शुक्राचार्यांची मी मुलगी' या अहंकाराला तिने नमविले.

महाभारतातील 'विदुला' या मानिनी स्त्रीने आपला मुलगा संजय याला रणांगणातून पळून आल्या पावली पराक्रमाचे धडे देऊन पुनश्च युद्ध प्रवृत्त केले. शूरवीराच्या कर्तव्याची जाण करून दिली. मला वाटते, स्त्रियांच्या समाज विकासातील भूमिकेचे प्रत्यंतर हेच आहे. येथे विदुलाचे शूर, मर्दानी, निर्भय रूप उलगडते. सौविर देशाचा राजकुमार संजय याची ही माता. एकदा शत्रूकडून पराभव पावून संजय नगराकडून पळून आला. तेव्हा विदुला ने त्याची कडक शब्दात निर्भत्सना केली. त्याला क्षात्र धर्माचा उपदेश करून लढाईत परत पाठविले. अशी ही शूर स्वाभीमानी स्त्री नवा पायंडा रूजवू शकली.

### अंबा- काशिराजाची कन्या

यासंदर्भात काशिराजाची कन्या 'अंबा' हिचे उदाहरण फार बोलके आहे. ते आपण योग्य अर्थासह समजून घेण्यासारखे आहे. अंबा, अंबालिका, अंबिका या काशिराजाच्या तीन कन्या होत्या. आजन्म ब्रह्मचारी राहण्याची प्रतिज्ञा केलेल्या देवव्रत भीष्माचार्यांनी त्यांना आपले भाऊ चित्रागंद आणि विचित्रवीर्य या भावांसाठी जिंकून आणल्या होत्या. राक्षस किंवा जबरी विवाह पद्धतीने त्याने हे घडवून आणले. परंतु त्यातील अंबेने मनाने शाल्वराजास वरले होते. तिने आपण शाल्वावर अनुरक्त असल्याचे स्पष्टपणे भीष्माचार्यांना सांगितले. भीष्माचार्यही मोठ्या उदार अंत:करणाने तिला शाल्वाकडे परत पाठवितात. राक्षस विवाह पद्धतीने तिला भीष्मानेच जिंकले असल्याने शाल्वराजा तिचा स्वीकार करीत नाही. तेव्हा एखाद्या त्रिशंकू सारखी अंबेची अवस्था होते; कारण भीष्म तर प्रतिज्ञित होता. आजन्म, अविवाहित राहण्याची प्रतिज्ञा केलेला पण म्हणून अंबेचे तेवढ्याने समाधान होत नाही. ती भीष्माला केलेल्या कर्माला निभवायला सांगते. पण भीष्म ऐकत नाही. तेव्हा आपल्याला न स्वीकारणाऱ्या भीष्माला धडा शिकविण्यासाठी भीष्माचार्यांचे गुरू साक्षात् देवावतार परशुराम यांना आपल्या कठोर तपश्चर्येने प्रसन्न करून घेते. पुढे 'शिखंडी' रूपाने ती भीष्माचार्यांच्या मृत्यूला कारण बनते. ही सूडाची भावना आक्षेपार्ह मानली तरी स्वत:च्या हिताची जपवणूक ती करते.सामाजिक परिवर्तनाच्या दिशेने वाटचाल करणाऱ्या स्त्रीचे हे दर्शन म्हणावे लागेल.

### सत्यवती: मत्स्यगंधा

महाभारतातील सत्यवतीचे समाज विकासाच्या दृष्टीने महत्त्वाचे उदाहरण आहे. एखाद्या २१ व्या शतकातील स्त्रीने आपल्या स्वत:च्या हक्कांसाठी जागृत असावे अशीच सत्यवतीची भूमिका आहे.

राजा शंतनू सत्यवतीच्या सौंदर्यावर लुब्ध होऊन तिच्या प्रेमात पडला तरी सत्यवती धीवरकन्या असूनही पुरेशी सावध आहे. ती आपल्या भावी पिढ्यांचे सारे न्याय, हक्क मागून घेते.

आत्ताशी कोठे तरी आपल्या कोर्टाने महिलांना संपत्तीत वाटा देण्याची तरतूद केली आहे. पण त्या प्राचीन काळात या सत्यवतीने दूरदृष्टीने आपल्या प्रपौत्रांच्यासाठी शंतनु राजाला अटी घातल्या. त्यामुळे तिची मुले राज्याचे उत्तराधिकारी आणि संपत्तीचे हकदार झाले. तेवढ्यासाठी भीष्माचार्याला राज्याचा उत्तराधिकारी न होण्याची आणि आजन्म ब्रह्मचारी राहण्याची ती प्रतिज्ञा करायला भाग पाडते. समाज विकासात जागृत स्त्रीने तेही सत्यवती सारख्या मत्स्यगंधेने नोंदविलेला हा एक महत्वाचा टप्पा आहे असे म्हणावे लागेल. स्वत:च्या हक्कांसाठी दूरदृष्टीने सजग असलेली सत्यवती स्त्री - मुक्ती चळवळीची उद्‌गाती म्हणून शोभून दिसेल.

अंबेने, जे घडले त्याला भीष्मालाच जबाबदार धरले होते तर सत्यवतीने आपला पुत्र चित्रांगद यालाच पित्याच्या गादीवर बसवून भीष्माकरवी सर्व कारभार सांभाळला. समाजशास्त्रीय समीक्षा पद्धतीचा अवलंब प्राचीन संस्कृत साहित्य समीक्षेसाठी केल्यास अभ्यासकांना याचा प्रत्यय येतो.








अनुक्रमणिका

**'याज्ञसेनी द्रौपदी'**

महाभारतात द्रौपदीला महत्त्वाचे स्थान आहे. एक अजरामर व्यक्तिरेखा म्हणून ते आहे स्वयंवर आणि वस्त्रहरण केशाकर्षण हे दोन महत्त्वाचे प्रसंग द्रौपदीच्या जीवनातील आहेत. महाभारतात सत्यवती, गांधारी, कुंती, माद्री, सुभद्रा अशा अनेक स्त्री-व्यक्तिरेखा आहेत; पण द्रौपदीच्या चित्रणात आगळेपणा आहे. ही सौंदर्यसम्राज्ञी लांब सडक केसांची लावण्यवती द्रौपदी महाभारतात महत्त्वाची कामगिरी बजावते. द्रौपदीची तेजस्विता हे महाभारताचे मोठे आकर्षण आहे. या द्रौपदीची जीवनकहाणी म्हणजे एका मानिनी, तेजस्विनीची विलक्षण कथा आहे. तिने सतत दु:खाचे आघात झेलले. परिस्थितीवर मात करण्याचे सामर्थ्य तिने दाखविले आहे.

द्यूतप्रसंगाने उद्‌भवलेली विटंबना सोसून ती पार बदलते. ज्वालेसारखी धगधगत राहून ती 'याज्ञसेनी' नाव सार्थ करते.

दु:शासनाकडून झालेल्या केशाकर्षण/वस्त्रहरणासारख्या अवहेलनाच्या वेळी ती धर्म आणि अधर्म याबाबत निर्भीड आणि तर्कशुद्ध प्रश्न सभेला विचारते. त्यात एका जागरूक सभेलाही निरुत्तर करू शकणाऱ्या स्त्रीची प्रचिती येते. समाज जागरण विकास करणारी ही प्रश्नोत्तरें झालेली आहेत.

आपल्या पतींना वेळप्रसंगी कार्यप्रवृत्त ती करते. प्रेरणाही देते. 'जो स्वत:ला असमर्थ समजतो त्याचे ऐश्वर्य कधीही वाढत नाही. म्हणून माणसाने स्वत:ला कधीही असमर्थ समजू नये.' असे धर्मराजालाही सांगायची वेळ तिच्यावर येते. यशापयशाची खंत न करता ती प्रयत्न आणि पराक्रमावर विश्वास ठेवते. याच प्रयत्न आणि पराक्रमांतून सामाजिक विकासाला चालना मिळू शकते.

दुर्योधन, दु:शासन, कर्ण, शकुनी, जयद्रथ या सारख्यांच्या दुष्कृत्यांना द्रौपदीला सामोरे जाऊनही सत्कृत्य करीतच रहावे लागते. तिच्या स्त्रीत्वाची ही खरी कसोटीच आहे. वनवास भोगतानाही द्रौपदीचे क्षात्रवृत्तीला पोषक असे आचरण घडले आहे.

महाभारतात न्यायप्रिय, सत्यनिष्ठ, प्रखर, महामानिनी म्हणून द्रौपदीचे स्थान आहे. द्रौपदी पांडवांची प्रतिष्ठा होती. त्यांच्या एकत्वाची, अभेयतेची चालती बोलती खूण होती. असे इरावती कर्वे यांना समाजशास्त्रीय अभ्यासातून जाणवले. पांडवाचे राजकारण कृष्णाने केले; आणि पांडवांची जपवणूक कुंती, द्रौपदी या दोन स्त्रियांनी केली. द्रौपदी पाच पांडवाची राणी झाली. या घटनेचे विश्लेषण त्यांच्या समाजशास्त्रीय दृष्टिकोनातून केले आहे.

पूर्वीच्या काळी मोठ्या मुलाला वंशपरंपरागत अधिकाराचा व द्रव्याचा वारसा मिळत असे. आई-वडिलांचे श्राद्ध व गृहस्थपणाची सर्व कर्तव्ये बजाविण्यासाठी त्याला लग्न आवश्यक असे. धाकट्या (खालच्या) भावाने लग्न करणे म्हणजे थोरल्याचे सामाजिक, कौटुंबिक, धार्मिक अधिकार हिरावून घेण्यासारखे होते. म्हणून थोरल्याआधी लग्न करणे अर्जुनासाठी गैर होते. अर्जुनाच्या विवाहानंतर एवढ्या मोठ्या तोलामोलाची पत्नी इतरांना लाभणे अवघड होते. हाही वास्तव प्रत्यक्षनिष्ठ मुद्दा इरावती कर्वे यांनी मांडला.

द्रौपदी जर एकाचीच झाली असती तर कलहाची बीजे पेरली गेली असती. कौरवांचा विनाश व पांडवांचे ऐक्य द्रौपदीनेच राखले. मानवी मूलभूत आणि नैसर्गिक प्रेरणांचा विचार येथे इरावती कर्वे यांनी केला आहे. द्रौपदी असेपर्यंत पांडवांत फूट पडणे शक्य नव्हते. युगान्ताची प्रत्येक यातना द्रौपदीने भोगली. पति-परायण द्रौपदीच्या त्यागाला तोड नाही. तत्काल-संदर्भात याचा विचार केला तर हे बहु-पतित्व, परित्राणाय साधुनाम्, यास्तव न्याय, नीती, धर्म, सत्य, पांडवांचे राज्य-प्रस्थापनेसाठी समाजाच्या विकासासाठी द्रौपदीने स्वीकारले असे म्हटल्यास वावगे ठरू नये असे वाटते. सीता प्रत्यक्षात भूमिकन्या होती पण द्रौपदीला या मातीचे रंग लाभलेले असल्याने खरी भूमिकन्या द्रौपदीच होती. कारण तिचे पाय भूमीवरच होते. महाभारताची ती आद्यशक्ती होती.

**गांधारी - कुंती**

गांधारी ही कौरवांची माता. जेव्हा दुर्योधनाने पांडवांशी वैर आरंभिले; तेव्हा तिने त्याला हितोपदेश केला. द्रौपदी आणि कुंतीला झालेला पुत्रशोक तिनेच कणखर मनाने त्यांना सावरायला लावला. समाजकुटुंबहित जपण्याचा तिचा प्रयत्न होता.

पांडवांची आई कुंती परोपकारी स्वभावाची होती. तिने एकचक्रा नगरीत व्यासमुनींच्या अनुमतीने राहत असताना त्या कुटुंबावर घरावर आलेली आपत्ती जाणून घेतली. त्या

घरातून बकासूर राक्षसासाठी मनुष्यबळी आणि गाडाभर अन्न पाठवायचे होते. तेव्हा कुंतीने, धर्मराज विरोध करीत असतानाही, त्याला न जुमानता भीमाला पाठवून त्या दुष्ट बकासुराचा वध करविला, आणि त्या कुटुंबास संकटमुक्त केले. याच कुंतीने कर्णजन्मरहस्य दडवून ठेवून दुष्टांचे निर्दालन व्हावे म्हणून पुढचे सगळे अनर्थ समाजहितासाठी सोसले.

अशा या महाभारतातील काही प्रमुख स्त्रिया, ज्यांनी नव्या समाजरचनेला अनुकूल असे समाजाच्या विकासाचे निर्मळ वातावरण निर्माण करण्यात आपला सहयोग दिला आहे.

*डॉ. भा. य. गिरीधारी*
*'विभा' पर्णश्री सोसायटी, नाशिक-४२२००५*
*भ्रमणभाष - ९८२३०१२३०१*

## जन्मशताब्दी : स्मृती-जागर

### विनोदकार - श्यामराव नीळकंठ ओक
(२७/१ १९०७ ते १०/३/१९८२)

१९३० ते १९५५ या काळातील साहित्यप्रवाहात विनोदकार, कथाकार, रूपान्तरकार म्हणून श्या. नी. ओक यांचे नाव आहे. गलोल (१९३८) बाभळवनात (१९३९) मालगाडी (१९४२) इ. विनोदी लेखसंग्रह - श्यामराई (१९६२) हा कथासंग्रह त्यांच्या नावावर आहेत.

गोल्डविनच्या 'गुड नेचर्ड मॅन', शेक्सपियरच्या 'कॉमेडी ऑफ एरर्स' ची अनुक्रमे भिडस्त माणूस (१९४४) आणि 'गड्या आपुला गाव बरा (१९५९) ही मराठी रूपान्तरे तसेच होमरच्या 'ओदिसी' (१९४४) आणि 'इलियद्' (१९८५) चे त्यांनी गद्यानुवाद केले.

### कवि - रा. अ. काळेले
(२२/२/१९०७ ते १२/६/१९८१)

कवी, काव्यसमीक्षक, कोशकार म्हणून रा. अ. काळेले यांचे नाव आहे. ते इंदूरच्या हायकोर्टात वकील होते. रविकिरण मंडळाच्या काव्यचळवळीने प्रभावित झालेले आणि कवि भा. रा. तांबे यांच्या काव्यापासून प्रेरणा घेऊन त्यांनी प्रणयप्रधान काव्य लिहिले. ओळखीचे सूर; भावपूर्णा, वसंतागम, गीतनिर्वाण, हिमअंगार इ. काव्यसंग्रह १९३५ ते १९६४ च्या दरम्यान प्रसिद्ध झाले. नवे अलंकार, तांबे - एक अध्ययन आणि नवकवितेचे एक तप हे काव्यसमीक्षेचे ग्रंथ १९५० ते ५७ च्या दरम्यान लिहिले. वीस भागांमधून लिहिलेला 'राजकोश' ही त्यांच्या लिखाणातील एक महत्त्वाची निर्मिती आहे.

### महाराष्ट्र काव्य कोकीळ - सोपानदेव चौधरी
(१६/१०/१९०७ ते ४/१०/१९८२)

कविता लिहिणे आणि ती समरसतेने गाऊन सादर करणे यामुळे जळगावच्या सोपानदेव चौधरींना 'महाराष्ट्र-काव्य-कोकीळ' ही पदवी मिळाली होती. पं. विष्णु दिगंबर पलुस्करांच्या गायनाने ते प्रभावित झाले होते. नाशिकच्या गांधर्व महाविद्यालयात ते संगीत-शिक्षक होते. १९२० पासून त्यांनी काव्य-गायनाचे महाराष्ट्रभर कार्यक्रम केले.

'झोक तोल! तोल!! तोल...ग!!!
आडाच पानी लई खोल...' किंवा
'माझी मायवोली आज आली माहेराला
सभोवती संत-योगी सुपुत्रांचा मेळा...'

इत्यादी कविता गायनाच्या स्मृती आज विरल्या असल्या तरी ज्यांनी हे ऐकले, त्यांचे मन आजही त्यातील माधुर्यगुणाने मोहरून येईल. मातोश्री बहिणाईच्या काव्याचा बहुमोल ठेवा त्यांनी १९५२ सालीच संकलित करून काव्यरसिकांसमोर आणला. त्यांच्या सर्व काव्याचे संकलन 'सोपानदेवी' (१९६२) मध्ये आहे.

### मुलांचे नाना - गोपीनाथ तळवलकर
(२९/११/१९०७ ते ७/६/२०००)

गोपीनाथ तळवलकर ह्यांनी काव्य, कादंवरी, चरित्र इ. लिखाण केले. पाचोरा (जळगाव) येथे शिक्षकी पेशा करीत त्यांनी साहित्यसेवा केली. 'आशियाचे धर्मदीप' मध्ये कृष्ण, बुद्ध, येशू, महंमद आणि झरतुष्ट्र यांची प्रेरक चरित्रे त्यांनी लिहिली. पं. नेहरू, अशोक या चरित्र-ग्रंथांचीही भर घातली. ज्ञानेश्वरीचे सुबोध गद्यसार, 'दुर्वांकूर' हा पहिला काव्यसंग्रह. आकाशमांदी, छाया-प्रकाश, नंदिनी, या कादंबऱ्या. 'बुद्धायन' हे खंडकाव्य इ. बहुविध लिखाणामुळे ते प्रसिद्ध होते. बालमनावर संस्कार करणारा शिक्षक प्रत्येक लिखाणात डोकावतो. वा. गो. आपटेंच्या 'आनंद' चे संपादन, पुणे आकाश-वाणीवर 'शिशुविहार' आणि 'बालोद्यान' या कार्यक्रमाचे सूत्रसंचालक. यामुळे ते 'मुलांचे नाना' म्हणून बालांमध्ये लोकप्रिय झाले. रानपाखरा, रायबा, बाळ जातो दूर देशा (मातृहृदय) इ कवितांनी ते आजही रसिकमनात गात आहेत.

(संकलन)

■






# कादंबरीकार विश्वास पाटील- गुणात्मक श्रेष्ठत्व

सौ. भाग्यश्री भारत जाधव

एखाद्या लेखकाच्या समग्र साहित्याचा अभ्यास करताना लेखकाला अभ्यासाच्या केंद्रस्थानी ठेवावे लागते. लेखकाने हाताळलेल्या वाङ्मयप्रकाराचा, वाङ्मयप्रकार म्हणून केला जाणाऱ्या अभ्यासापेक्षा, लेखक आणि त्याचे वाङ्मय यांच्या अन्योन्य संबंधांना तसेच त्यातून निर्माण झालेल्या आणि वेगवेगळ्या फलनिष्पत्तीच्या आधारानेच एखाद्या लेखकाच्या कामगिरीचा ताळेबंद मांडावा लागतो. विश्वास पाटील हे एक विविध वाङ्मय प्रकार हाताळणारे प्रतिभावंत लेखक आहेत. प्रस्तुत निबंधात विश्वास पाटील यांनी त्यांच्या कादंबऱ्यात हाताळलेल्या विविध स्वरुपाच्या वाङ्मय लेखनाचे विवेचन करण्याचा प्रयत्न केलेला आहे. एखादा लेखक आयुष्यभर निष्ठापूर्वक एकाच वाङ्मय प्रकारात वाङ्मयनिर्मिती करतो. तर काही लेखक वेग-वेगळ्या वाङ्मयप्रकारात आवर्जून आणि समर्थपणे लेखन करताना दिसतात. यापैकी काही लेखक हौस म्हणून लिखाण करतात. तर काहीजण चलनी नाणं; म्हणून किंवा अन्य काही व्यावहारिक कारणासाठी लिहितात. याशिवाय काही लेखक विविध वाङ्मय प्रकारातील कलानिर्मिती करण्याऐवजी कसबी कारागिरीच जास्त प्रमाणात साधताना दिसतात. पण काहीजण गंभीरपणे एकाच साहित्य प्रकारात विविधता हाताळतात. त्यामुळे त्यांचे साहित्य तितक्याच गंभीरपणे घ्यावे लागते.

विश्वास पाटील इतिहास विषय घेऊन एम.ए झाले. त्यांच्या अभ्यासाचा व आवडीचा विषय इतिहास! एम.पी.एस.सी.ची परीक्षा देऊन ते तहसीलदार झाले. तेव्हा त्यांचा वास्तव सामाजिक समस्यांशी जवळून संबंध आला. धरणग्रस्तांचे जीवन त्यांनी जवळून पाहिले. त्यामुळे त्यांच्या 'झाडाझडती' या कादंबरीचा 'धरणग्रस्त' हाच विषय झाला.

सुरुवातीच्या काळात पाटील यांनी 'कायदा' ही कथा लिहिली. लेखक ज्या सामाजिक वातावरणात वावरत होते त्या वातावरणाचा, सामाजिक परिस्थितीचा तसेच ऐकलेल्या व भावलेल्या लोकगीतांचा, कथांचा कळत-नकळत झालेला परिणाम म्हणजे त्यांची सुरुवातीची कथा 'कायदा'. ह्या त्यांच्या लिखाणातून नवथरपणा जाणवतो. लेखकाच्या महाविद्यालयीन जीवनातच 'कलालचौक' हा कथासंग्रह प्रसिद्ध झाला. महाराष्ट्रात अनेक प्रयोग झालेले व 'चंद्रलेखा' संस्थेने सादर केलेले 'रणांगण' हे नाटकसुद्धा लेखकाचे सुरुवातीचे नवथर लेखनच आहे.

लेखकाचा उद्देश सामाजिक समस्या, राजकीय संभ्रम, ऐतिहासिक सत्यासत्य या विषयांशी भिडून भावलेले सत्य साहित्यकृतीतून मांडणे हा असतो. विश्वास पाटील हे त्यापैकी एक लेखक आहेत. त्यांनी 'पांगिरा', 'आंबी', 'झाडाझडती', 'चंद्रमुखी' या सामाजिक आशयाच्या कादंबऱ्या लिहिल्या. त्यांची 'पानिपत' ही ऐतिहासिक कादंबरी आहे. त्यांच्या 'क्रांतीसूर्य', 'संभाजी' व 'महानायक' ह्या कादंबऱ्या ऐतिहासिकच परंतु कालपटाच्या बाबतीत वर्तमानाच्या सीमेलगतची आणि राजकारणाशी व स्वातंत्र्यसंग्रामाशी निगडीत असल्यामुळे वैशिष्ट्यपूर्ण पैलूंनी साकारलेल्या आहेत. त्यांनी संभाजी या कादंबरीतून ऐतिहासिक सत्ये सांगण्याचा प्रयत्न केला आहे. शिवपुत्र संभाजीराजांना खऱ्या अर्थाने ऐतिहासिक सत्याला धरून न्याय देण्याचा प्रयत्न केला आहे. बखरकारांनी व आधुनिक इतिहासकारांनी संभाजीराजांची प्रतिमा मलीन केली होती. संभाजी या व्यक्तिमत्वाला बदफैली, व्यसनी म्हणून रंगविले होते. परंतु ऐतिहासिक कागदपत्रांचा मागोवा घेऊन विश्वास पाटील यांनी संभाजीराजांचे त्यांना भावलेले चित्रण केले आहे.

कथालेखनाने साहित्यनिर्मितीचा आरंभ करणारे विश्वास पाटील, कादंबरीसारख्या वाङ्मयीन प्रकाराकडे लवकरच वळले, कारण त्यांच्या अनुभवविश्वाच्या प्रकटीकरणास कथा वाङ्मय प्रकार अपुरा वाटला असावा, सुरुवातीच्या

काळांत त्यांनी 'आंबी' व 'क्रांतीसूर्य' सारख्या सामाजिक परिस्थितीचे विवेचन करणाऱ्या कादंबऱ्यांचे लिखाण केले. या साहित्यकृतींना पूर्णार्थाने प्रौढ साहित्य-कृती म्हणता येणार नाही. पण या साहित्यकृती सामाजिक जाणिवा, राजकीय जाणिवा व व्यक्तिस्वातंत्र्याचे महत्त्व नक्कीच विशद करतात. विश्वास पाटील यांनी 'पांगिरा' मधून ग्रामीण जीवनामध्ये डोकावले आणि एका वेगळ्या साहित्याची निर्मिती केली. त्यांच्या पांगिराच्या लिखाणातून प्रकट झालेले सामाजिक अनुभव हे त्यांनी स्वीकारलेल्या वाङ्मय प्रकाराच्या अपेक्षा पूर्ण करणारे आहेत असे वाटते.

ज्यावेळी ऐतिहासिक कादंबरीचे दिवस संपलेले आहेत असे वाचकांना, काही साहित्यिकांना व समीक्षकांना वाटत होते; त्याच वेळी सन १९८८ मध्ये विश्वास पाटील यांनी वयाच्या २८ व्या वर्षी 'पानिपत' ही ऐतिहासिक कादंबरी लिहिली आणि मराठी ऐतिहासिक कादंबरीला एका नव्या वळणावर आणले. त्यापूर्वी पानिपत या विषयावर विविध स्वरूपात लिखाण झालेले होते. तरीसुद्धा विश्वास पाटील यांच्या पानिपत कादंबरीला वेगळेपण होते, वेगळी वैशिष्ट्ये होती त्यामुळे त्यांचे कादंबरी लेखन वाचकांच्या बरोबर समीक्षकांच्या पसंतीस उतरले. मराठ्यांच्या पराभवाचा जुनाच इतिहास पानिपतच्या स्वरूपाने पानिपतकरांनी ऐतिहासिक कादंबरीत मांडला व लोकांनी तो मन:पूर्वक स्वीकारला. त्याचे कारण म्हणजे मराठी माणसांच्या स्वभावाचे, त्यांच्या गुणदोषांचे, स्वभाव वैशिष्ट्याचे एक सुंदर प्रतीक म्हणजे 'पानिपत'. लेखकाने या ऐतिहासिक कादंबरीतून साकार केलेला समाज, व्यक्तिरेखा, भाऊबंदकी याविषयीचे लिखाण ऐतिहासिक वातावरण निर्माण करते. त्याचबरोबर ऐतिहासिक सत्य आणि संभाव्यता यांचा स्वाभाविक आयाम निर्माण करते.

सन १९९२ मधील 'झाडाझडती' च्या रुपाने सामाजिक परिस्थितीकडे गंभीर वृत्तीने पाहणारा लेखक अशीच विश्वास पाटील यांची प्रतिमा निर्माण झाली व ती सार्थही आहे. त्यांची ही निर्मिती सामाजिक विषय हाताळणाऱ्या कादंबरी क्षेत्राला निश्चितच एक वेगळेपणा प्राप्त करून देते. विश्वास पाटील यांनी आपल्या सभोवतालचे जे अनुभव धरणग्रस्तांच्या रूपाने मांडले; ते अनुभव अतिशय व्यापक आणि संमिश्र स्वरूपाचे आहेत. 'झाडाझडती' मधील विषय वास्तववादी दृष्टिकोनातून हाताळलेला आहे. विषयाच्या मांडणीने एक व्यापक सामाजिक जाणीव समोर ठेवलेली आहे. कथानकाचा प्रदीर्घ कालपट, प्रसंग, घटना, व्यक्तिचित्रे, सत्ताकेंद्र, संघर्ष यासारखे विचार कादंबरीला एक वेगळे व असाधारण असे वाङ्मयीन महत्त्व प्राप्त करून देतात. अनेक मान्यवर अभ्यासकांच्या व समीक्षकांच्या मते विश्वास पाटील यांनी हा विषय हाताळून तरुण वयातच एका प्रौढ साहित्यिकाला शोभेल असे लेखन केले आहे.

'आंबी', 'क्रांतिसूर्य', 'पांगिरा', 'पानिपत', 'चंद्रमुखी', 'झाडाझडती'- या लेखनानंतर पाटील यांनी चरित्रात्मक कादंबरीला हात घातला. चरित्रात्मक कादंबरीला अनेक स्थित्यंतरातून प्रवास करावा लागतो. अशा कादंबऱ्या लिहीत असताना लेखकाला चरित्रनायकाचा चरित्रकार व्हावे लागते. त्याचबरोबर त्यांचे समकालीन मित्र व विरोधकांच्याही चरित्राचा अभ्यास करावा लागतो. 'कादंबरी या वाङ्मयप्रकाराला फारशा रुढ वाटा नाहीत. जंगलातल्या आडवाटा सारखे अनेक चकवे आहेत.' अशा शब्दात 'महानायक' च्या लिखाणाचे अनुभव विश्वास पाटील यांनी विशद केले आहत. पाटील यांनी १९९८ मध्ये साकारलेल्या 'महानायक' या नेताजी सुभाषचंद्र बोस यांच्यावरील चरित्रात्मक कादंबरीचा अभ्यास करताना अनेक आडवाटा शेवटी केंद्रबिंदूवर येतात व कादंबरीचा संपूर्ण गाभा लक्षात येतो. ही चरित्रात्मक कादंबरी अभ्यासकाला ऐतिहासिक, राजकीय, सामाजिक, राष्ट्रीय अशा विविध पातळ्यांचा अनुभव देऊन जाते. लेखकाच्या सततच्या आठ, नऊ वर्षाच्या अभ्यासाने आणि अनेक देशांच्या भाषांच्या सीमारेषेत अडकलेली महानायकाची ही प्रेरक कहाणी पुरेशा व दर्जेदार संशोधनाच्या बळावर चितारलेली आहे. लेखकाने केवळ भाषेच्या फुलोऱ्याने भरलेला पारंपारिक कादंबरीतील पोवाडा न लिहिता सुभाषचंद्र बोस यांची वास्तव व्यक्तिरेखा रेखाटलेली आहे. व्यक्तिरेखेबरोबर स्वातंत्र्य चळवळीच्या धामधुमीचा आणि स्वातंत्र्य लढ्याचा चैतन्यमय कालखंड पाटील यांनी या चरित्रात्मक कादंबरीतून मांडला आहे. उमलत्या वया-पासूनच लेखकाला महानायक या व्यक्तिरेखेने भारावून टाकले होते. त्यामुळेच महापुरासारखी सरकत जाणारी पण निश्चित दिशा असलेली 'महानायक' ही व्यक्तिरेखा



अनुक्रमणिका

साकारणे लेखकाला शक्य झाले.

पाटील यांनी ऐतिहासिक कागदपत्रांचा मागोवा घेऊन आणि छत्रपती संभाजीमहाराजांच्या वास्तवाशी संबधित विविध स्थळांना भेटी देऊन संभाजीराजांची वास्तव व्यक्तिरेखा त्यांच्या जीवनातील थरारनाट्य साहित्यात आणण्याचा प्रामाणिक प्रयत्न 'संभाजी' या ऐतिहासिक कादंबरीत केलेला आहे. लेखकाने संभाजी या धीरोदात्त व्यक्तिमत्त्वाचा आणि लढवय्या मुत्सद्देगिरीचा परिपूर्ण अभ्यास केलेला आहे. त्यांना असणाऱ्या विरोधकांचाही सखोल व अभ्यासपूर्ण जीवनपट कादंबरीत घेतलेला आहे. यामुळेच 'संभाजी ही महाकादंबरी वाचकांना व अभ्यासकांना पुढील प्रसंगाची सतत ओढ लावून ठेवते. संभाजीराजाच्या जीवनाची चित्तथरारक वादळी व वास्तवगाथा म्हणजे 'संभाजी' कादंबरी विश्वास पाटील यांच्या वाङ्मयनिर्मितीतील महत्वाचा टप्पा आहे.

लेखकाच्या प्रकृतीविशेषांशी अधिक जुळणारा वाङ्मय प्रकार कोणता? हा एक महत्वाचा प्रश्न साहित्यनिर्मिती करणाऱ्या लेखकाचा अभ्यास करताना उपस्थित करणे आवश्यक असते. लेखनातील सराईतपणा आणि तंत्रावरील पकड यामुळे एखादा लेखक तो हाताळत असलेल्या सर्वच वाङ्मय प्रकारामध्ये यशस्वीपणे वाङ्मयनिर्मिती करू शकतो. हेच सूत्र विश्वास पाटील यांच्या वाङ्मयीन लिखाणाला लावता येईल. एखाद्या वाङ्मयप्रकारातील त्याच लेखकाची निर्मिती 'गुणात्मक श्रेठता' प्राप्त करण्याची असल्याचे जाणवते. असे होण्याचे कारण म्हणजे तो वाङ्मयप्रकार लेखकाच्या प्रकृतिविशेषाशी अधिक जुळणारा आहे हे होय. त्याचबरोबर एखाद्या लेखकाचा खराखुरा कस जोखावा तो त्याच्या वांङ्मयप्रकाराच्या अभ्यासाने, असे म्हणणे म्हणूनच रास्त ठरते.

विश्वास पाटील यांनी कथा लिहिल्या. नाटक लिहिले पण या वाङ्मय प्रकारापेक्षा कादंबरी हा वाङ्मयप्रकार त्यांच्या प्रकृती धर्माशी अगदी अचूकपणे जुळतो आहे.

*सौ. भाग्यश्री भारत जाधव*
*भाषाविभाग, यशवंतराव चव्हाण इन्स्टिट्यूट*
*ऑफ सायन्स, सातारा- ४१५००१*

■

# फाळणी : एक दुःखद विजय

प्राचार्य पद्माकर पुंडे

फाळणी हा एक दुःखद विजय. भारताच्या मस्तकावरील सतत वाहणारी अश्वत्थाम्याची जखम ! माणुसकीचा मृत्यू, क्रौर्य, हिंसा आणि जातीय विद्वेषाचे अविस्मरणीय हिडीस रूप. भारतीय इंग्रजी साहित्यात याचे पडसाद लक्षणीय कादंबरीच्या रूपाने कसे अवतरले त्याचा सुबोध आढावा इंग्रजी विषयाचे प्राध्यापक प्राचार्य पद्माकर पुंडे यांनी घेतला आहे.

ब्रिटिशांनी भारताला स्वातंत्र्य देण्याचे ठरविले; पण त्यांच्यापुढे प्रश्न होता- हे कसे करायचे? हा प्रश्न निर्माण झाला होता त्याचे कारण होते मुस्लिम नेते अन् काँग्रेस नेते यांच्या परस्पराविरोधी मागण्या. दहा कोटी मुस्लिमांचे प्रतिनिधित्व करणारे मोहमंद अली जीना हे 'स्वतंत्र' इस्लामिक; देश' या मागणीवर ठाम होते; तर तीस कोटी हिंदूंपैकी बहुतांश हिंदूंचे प्रतिनिधत्व करणारे काँग्रेसचे नेते 'एकसंध भारत ' टिकविण्यासाठी निश्चित प्रयत्नात होते. भारताला स्वातंत्र्य देण्याची तयारी अन् स्वातंत्र्य देण्यामधील अडचण यावर मार्ग काढण्यासाठी ब्रिटनने हुशार अन् खंबीर अशा लॉर्ड माऊंटबॅटन यांची भारताचे शेवटचे व्हाईसरॉय म्हणून नियुक्ती केली. भारताची एकसंघता टिकविणे अत्यंत अवघड आहे; अन् या देशाचे विभाजन करून कुठलाही त्रास अथवा विध्वंस न होता स्वातंत्र्य बहाल करणे हे त्याहूनही अवघड आहे. हे जाणून लॉर्ड माऊंटबॅटन ही जबाबदारी स्वीकारण्यास तयार नव्हतेच. हे सर्व टाळण्यासाठी माऊंटबॅटनने मागणी केली की, व्हाईसरॉय म्हणून त्यांना पूर्ण स्वातंत्र्य हवे अन् लंडनहून कुठलेही आदेश, सूचना, हुकमत येता कामा नये . म्हणजेच आपल्या या ब्रिटिश सरकारच्याही वरचढ हक्काच्या मागणीमुळे पंतप्रधान ॲटली ही नेमणूक मागे घेतील. परंतु ॲटली यांनी माऊंटबॅटन यांच्या सर्व मागण्या मान्य केल्या. जेव्हा माऊंटबॅटन यांनी आपण भारतात शेवटचा व्हाईसरॉय म्हणून जात आहोत ही बातमी त्यांच्या आईला सांगितली; तेव्हा त्यांच्या आईची प्रतिक्रिया खूपच धक्कादायक होती- 'Viceroy of India? Damn, Damn, Damn, Damn, DAMN' माऊँटबॅटन म्हणतात, त्यांच्या आईच्या तोंडी 'डॅम' हा शब्द आजपर्यंत कधीही आला नव्हता. त्यांची पत्नी एडविना यांचाही माऊंटबॅटन यांनी भारतात वाव्हेल यांची जागा घेण्यास सक्त विरोध होता.

इकडे नौखालीतील श्रीरामपूर येथे महात्मा गांधीजी इतक्या प्रयत्नाने मिळविलेले स्वातंत्र्य म्हणजे एक 'दुःखद विजय' ठरतोय की काय; या चिंतेत होते. सामाजिक व धार्मिक भिन्नता अन् आर्थिक विषमतेमुळे हिंदू- मुस्लीम अगोदरच एकमेकांपासून दुरावलेले होते अन् त्यात भर पडली जीनांच्या स्वतंत्र मुस्लिमराष्ट्राच्या मागणीची ! सर्वधर्मसमभावाचे प्रतीक असलेल्या महात्मा गांधीजीवरही मुस्लिम नेत्यांचा विश्वास राहिला नव्हता. कदाचित् गांधीजींची ईश्वरावरील निष्ठा हेही त्याचे कारण असू शकेल. खरेतर भारतीय मुस्लिमांचे स्वतंत्र राष्ट्र असावे अन् त्याचे नाव पाकिस्तान असावे, हा विचार २८ जानेवारी १९३३ रोजी रहमत अली या विद्यार्थ्याने इंग्लंडमध्ये मांडला होता. देशाच्या विभाजनाला गांधीजींचा ठाम विरोध असूनही जीनांच्या प्रखर मागणीमुळे माऊंटबॅटन यांनी नेहरू, पटेल अन् शेवटी गांधीजी यांना भारताच्या फाळणीचे तत्त्व स्वीकारायला लावले अन् त्यातूनच आधुनिक इतिहासातील एका भयानक, विध्वंसक घटनेचा उगम झाला. एका पत्रकार परिषदेत माऊँटबॅटन यांनी भारताच्या स्वातंत्र्याची अन् फाळणीची तारीख जाहीर केली; तेव्हा यासाठी फक्त त्र्याहत्तर दिवस राहिलेले होते. अन् जातीय दंगलींना सुरुवात झाली होती. अहिंसेच्या मार्गाने मिळविलेल्या स्वातंत्र्याबरोबरच प्रखर हिंसेची देणगी मिळाली. भारत अन् पाकिस्तान या दोन्ही बाजूला मृत्यूचे थैमान भयानक होते. त्याचे वर्णन एका ब्रिटिश पोलिस अधिकाऱ्याने केले आहे., 'Death could come like lightening. It was over like a flash. Before you could say ' knife' you would see a body lying in the streets, every door was shut and no one was in sight.' धार्मिक





कडवेपणा टोकाला गेला होता. पिढ्यान्‌पिढ्याचे मित्र एकमेकांच्या जिवावर उठले होते.

खुशवंतसिंग अतिशय दुःखाने म्हणतात, For me, and millions like me, this independence Day was a tragedy. They'd mutilated the Punjab and I had lost everything.' फाळणीतील भयानकता, क्रौर्य, हिंसा अन्‌ माणुसकीचा मृत्यू या सर्व गोष्टींचा परिणाम साहित्यिकांवर न झाला तर नवलच ! खुशवंतसिंग यांनी या घटनेवरच 'ट्रेन टु पाकिस्तान' ही कादंबरी लिहिली आहे.

भारताच्या फाळणीतून निर्माण झालेल्या क्रौर्य व हिंसा या विषाचा प्याला पिण्यास कुणी भगवान शंकर नव्हते. त्यामुळे त्यात लाखो निरपराध माणसांचे बळी गेलेच ! पण स्वातंत्र्यासाठी ज्यांनी आयुष्यभर लढा दिला; त्या राष्ट्रपित्यांचाही बळी गेला, या भयानक घटनेवर इंग्रजीत सात कादंबऱ्या, असंख्य कविता व कथा लिहिल्या गेल्या. 'फ्रीडम ॲट मिडनाईट' या पुस्तकात कॉलिन्स व लपिअरे यांनी फाळणीची प्रक्रिया, पडसाद अन्‌ गांधीजीचे हौतात्म्य याचे सखोल विश्लेषण केले आहे.

१. भारताच्या फाळणीवरील पहिली मनाला भिडणारी, गाजलेली कादंबरी म्हणजे खुशवंतसिंग यांची 'ट्रेन टू पाकिस्तान' (१९५६) सतलज नदीच्या काठी सीमा-प्रदेशात असलेल्या मनोमाजरा या छोट्याशा गावाच्या वर्णनाने कादंबरीची सुरुवात होते. हे एक शांत गाव आहे. सर्वधर्माचे लोक येथे बंधुभावाने व प्रेमाने राहतात. गावालगत रेल्वे स्टेशन आहे. सकाळी येणाऱ्या ट्रेनच्या आवाजाने गावचे व्यवहार सुरु होतात अन्‌ रात्रीच्या शेवटच्या 'ट्रेन'च्या आवाजानंतर लोक निद्राधीन होतात. अचानक एक दिवस या स्टेशनवर हिंदू अन्‌ शीख यांची प्रेते असलेली 'घोस्ट ट्रेन' पाकिस्तानच्या बाजूने येते; अन्‌ एरवीचे शांत, प्रेमाचे वातावरण ढवळून निघते. या गावात लाला रामलाल या एकमेव हिंदू व्यतिरिक्त शीख व मुस्लीम सारख्याच संख्येने आहेत. हे सर्वजण गुण्यागोविंदाने एकत्र राहत असतानाच ही 'घोस्ट ट्रेन' येते. आजपर्यंत गावातील शांतता भंग करणारी एकमेव गोष्ट म्हणजे डाकूंचे हल्ले; ही होती. त्यातील जगतसिंग हा एक डाकू आपल्या डाकूगिरीमुळे दहशत निर्माण करणारा. जग्गा गावातील अंध मुस्लिम मुल्लाच्या मुलीच्या नूरनच्या प्रेमात पडला होता. सर्वत्र सुरू झालेल्या हिंदु-मुस्लिम दंगलीपुढे सीमा प्रदेशातील या गावातील शांतता भंग पावू नये म्हणून मॅजिस्ट्रेट व डेप्युटी कमिशनर हुकूमचंद या गावात तळ ठोकून होते. त्याच गावात इक्बाल नावाचा आधुनिक विचारसरणीचा तरूण येतो व त्याच्या क्रांतिकारक विचारसरणीमुळे सर्वांनाच गोंधळात टाकतो. याचवेळेस ही 'घोस्ट ट्रेन' येते अन्‌ गर्दी गोंधळ नसलेल्या या 'शांत' ट्रेनला पाहण्यासाठी गावकरी जाऊ लागताच पोलीस व हुकुमचंद यांना अडवतात. या 'गूढ' ट्रेनबद्दल चर्चा सुरू होते. मुल्ला इमाम बक्श, भाई मीतसिंग व बांटासिंग हे अस्वस्थपणे परमेश्वराची प्रार्थना करतात. पोलीस बंदोबस्तात गावात दोन मिलिटरीच्या गाड्या येतात व रॉकेल अन्‌ लाकूड गोळा करून स्टेशनकडे जातात. गावकऱ्यांना 'घोस्ट ट्रेन' चे रहस्य कळते ; अन्‌ या प्रचंड धक्क्याने गावात भयाण शांतता पसरते. 'घोस्ट ट्रेन' चा धसका घेऊन मनोमाजरा गावा-जवळच्या इतर गावातील मुस्लीम लोक निर्वासित छावणीकडे जातात. पण मनोमाजरातील मुस्लीम मात्र अद्याप गावातच आहेत. गावच्या बैठकीत शीख बांधव ठामपणे सांगतात की, हे गाव जितके शीखांचे आहे तितकेच मुस्लीमांचे आहे अन्‌ म्हणून त्यांनी या गावातच रहावे. इमाम बक्श तर या गावाशी इतका एकरुप झालेला होता की, हे गाव सोडून जाण्याची कल्पनाही त्याला सहन होत नाही. परंतु सीमेच्या पलीकडून या गावात आलेल्या शीख निर्वासितांच्या भयानक कथांपुढे गावातील अस्वस्थता वाढू लागते. परिस्थितीचा वाढणारा ताण पाहून शेवटी मुस्लिम गावकरी निर्वासित छावणीकडे जाण्याचे ठरवितात. याही वेळेस गावातील शीख बांधव त्यांना आश्वासन देतात की, त्यांची घरे व मालमत्ता यांचे रक्षण केले जाईल. हे सर्व संपल्यावर त्यांनी परत येऊन पूर्वीसारखेच गावात रहावे. नूरज डाकूजग्गाच्या मुलाची आई होणार असते व तिला जग्गाला सोडून जायचे नसते. परंतु जग्गाची आई तिला स्वीकारत नाही; म्हणून नाईलाजाने आपल्या अंध पित्याबरोबर निर्वासित छावणीत जाते. गावातील मुस्लिम निर्वासित छावणीत गेल्यावर इकडे मल्ली डाकू व त्याची टोळी मुस्लिमांची घरे लुटतात. अशातच बाहेरून आलेले काही शीख तरुण गावातील शीखांना भेकड व षंढ म्हणून हिणवितात. सीमेपलीकडे हिंदू व शीख यांच्यावर झालेल्या

क्रूर व भयानक हल्ल्याच्या कथा सांगून भडकवितात. 'घोस्ट ट्रेनमधून' आलेल्या मृत हिंदू व शीख यांच्या मृत्यूचा बदला घ्यायला उद्युक्त करतात. या 'घोस्ट ट्रेन'च्या बदल्यात दुप्पट मुस्लिमांच्या प्रेताने भरलेली ट्रेन पाकिस्तानात पाठविली पाहिजे. यासाठी भडकावून देतात अन् मनोमाजरा पेटून उठते. भाईमीतसिंग हे थांबविण्यासाठी सर्वांना सांगण्याचा प्रयत्न करतो की, मनोमाजरातील मुस्लिम निष्पाप व निरुपद्रवी आहेत, त्यांना का मारायचे? पण एकदा सूडभावनेने माथी भडकली की कुणी ऐकत नाही व मुस्लिम निर्वासितांची ट्रेन पाकिस्तानकडे जाताना मनोमाजरा स्टेशनवर हल्ला करून सर्वांची कत्तल करायची व पाकिस्तानकडे 'घोस्ट ट्रेन' पाठवायची असे ठरते. सलोखा व शांतता असलेले छोटेसे गाव फाळणीमुळे निर्माण झालेल्या जातीय दंगलीमुळे कसे पेटून उठते, बंधुभावाने राहणारे भिन्नधर्मीय लोक, धार्मिक कडवेपणाच्या आहारी जाऊन कसे क्रूर होतात, राजकीय सत्तास्पर्धेतून घडलेल्या अविचारी कृत्यातून निष्पाप लोकांचा कसा बळी जातो; याचे मन सुन्न करणारे चित्र खुशवंतसिंग यांनी रेखाटले आहे. यातच कुठेतरी प्रेम, माणुसकी शिल्लक असते. त्यावरच विध्वंसाच्या लाटेनंतर जग पुन: उभे राहते. हे दिसते. डाकू जगतसिंगच्या बलिदानातून मनोमाजरातील सर्वांनी ठरविले आहे. मुस्लिम निर्वासितांना पाकिस्तानकडे घेऊन जाणाऱ्या ट्रेनवर हल्ला करायचा ती ट्रेन पुलावर आडवा दोर बांधून अडवायची व सर्व मुस्लिमांना कापून काढायचे. अशावेळेस आपली प्रेयसी, होणाऱ्या मुलासह याच ट्रेनमधून जाणार आहे व म्हणून डाकू जगतसिंग या सर्व कट्टर जातीय विद्वेषापलीकडे जाऊन ट्रेन अडविण्यासाठीचा दोर कापण्यासाठी पुढे सरसावतो. अतिशय नाट्यमयरित्या खुशवंतसिंग यांनी कादंबरीचा शेवट केला आहे. इकडे लोक तलवारी, भाले घेऊन सज्ज आहेत तर तिकडे जगतसिंग दोरावर चढून ट्रेन सुखरूप पुलावरून पुढे जावी म्हणून दोर कापण्याच्या प्रयत्नात आहे. हे पाहून चिडलेले, सूडभावनेने पेटलेले लोक जगतसिंगावर गोळी चालवितात. तशाही अवस्थेत जग्गा दोर कापतो व मुस्लीम निर्वासितांची ट्रेन पाकिस्तानकडे सुखरूप रवाना होते अन् जग्गा प्राण सोडतो. राजकीय सत्तास्पर्धा, धर्मांध कडवेपणा यामुळे निर्माण होणाऱ्या हिंसेवर प्रेम, माणुसकी मात करते हेच खुशवंतसिंग यांनी दाखविले आहे जातीय-दंगलींच्या विरोधात मानसिकता निर्माण केली आहे.

२) बालचंद्र राजन यांच्या 'द डार्क डान्सर' (१९५९) या कादंबरीत फाळणीची पार्श्वभूमी आहे. परंतु कादंबरीतील खरा संघर्ष पाश्चात्य-पौर्वात्य संस्कृती यांच्यातील आहे. कादंबरीचा नायक कृष्णन् दहा वर्षे इंग्लंडमध्ये राहून भारतात परतला आहे. कृष्णन्‌ची परतण्याची वेळ आहे. १९४७ साल अन् देश फाळणी ज्वराने पेटला आहे. कृष्णन्‌चे अयशस्वी लग्न व फाळणीतील विध्वंस या दोन्ही शोकांतिका समांतरपणे समोर येतात. अतिशय उद्विग्न मन:स्थितीत कृष्णन् आपल्या केंब्रिजमधील मैत्रिणीला म्हणतो 'देशाची फाळणी करून ब्रिटशांनी भारतातील अनेक पिढ्यांसाठी त्रास व विध्वंसाचा डोंगर उभा केला आहे. यावर ही ब्रिटीश मैत्रीण त्याला सांगते 'या देशात ब्रिटीशांनी जे तीनशे वर्षात केले नाही ते भारतीयांनी आपल्या स्वातंत्र्याच्या तीन आठवड्यात केले आहे.' जातीय विद्वेषातून असाच विध्वंस होतो.

३) मनोहर माळगावकर यांच्या 'डिस्टंट ड्रम' (१९६०) या कादंबरीत फाळणीच्या संक्रमणकाळातील सैनिकी आयुष्याचे चित्रण आहे. ब्रिटिशराजची भारतातील शेवटची वर्षे काँग्रेस राजवटीचा स्वतंत्र भारतातील सुरुवातीचा काळ या संक्रमणकाळात सैन्यात अधिकारी असलेला कादंबरीचा नायक, यश-अपयश या आंदोलनात अडकतो. किरण गरूड हा सातपुडा रेजिमेंटचा अधिकारी, सैनिकी शिस्तीतला हा अधिकारी गुंतागुंतीच्या परिस्थितीतून कसा मार्ग काढतो त्याची ही कथा. एका बाजूला आपल्या प्रेमात यशस्वी होणे अन् दुसऱ्या बाजूला आपल्या मुस्लिम मित्राशी मैत्री टिकविणे; ही कसरत करताना किरणला प्रेमात यश अन् मैत्रीत अपयश येते. एका सैनिकाची ही कथा असली तरी हा सैनिकनायक सैन्यदलातील अधिकाऱ्यांचा प्रातिनिधिक असा नाही. ही सर्व त्याची व्यक्तिगत कथा आहे. किरणचे एका ब्रिटिश अधिकाऱ्याच्या पत्नीशी असलेले संबंध व परिणामत: त्या अधिकाऱ्याने केलेली आत्महत्या; यामुळे किरण शहाणा होतो. बीनावर त्याचे नितांत प्रेम आहे म्हणूनच किरण बीनाच्या वडिलांसमोर ठाम राहतो व त्यातूनच किरण-बीना शेवटी आनंदाने एकत्र येतात. किरण व अब्दुल जमाल हे एकाच वेळी भारतीय

सैन्यात दाखल झाले व त्यातूनच एकमेकांचे घनिष्ठ मित्र झाले. भारतीय सैन्यातून दोघेही एकाच वेळी युद्धभूमीवर लढले. एवढचे नव्हे; तर फाळणीच्या वेळेस झालेल्या जातीय दंगलीच्या वेळेस दोघेही दिल्लीत बरोबरच होते. परंतु फाळणी झाली अन् दोघे एकमेकांपासून दुरावले, कारण अब्दुल पाकिस्तानला जाऊन एका पाकिस्तानी रेजिमेंटचा प्रमुख होतो तर इकडे किरण भारतीय सैन्यात लेफ्टनंट कर्नल होतो. पुन: एकदा नियती या दोन मित्रांना समोरासमोर आणते. पण आता प्रसंग असतो तो दोघांच्या सैन्यातील युद्धाचा अन् ठिकाण असते काश्मीर-फाळणीनंतरचे काश्मीर. इथे द्वंद्व होते ते मैत्री अन् राष्ट्रीय कर्तव्य यांचे! फाळणीच्या वादळात दोन मित्र पाचोळ्यासारखे उडून एकमेकांपासून दूर जातात. फाळणीमुळे किरणला त्याची प्रेमिका मिळते; पण मित्र दूर जातो. माळगांवकर यांनी फाळणीतून निर्माण झालेल्या एकूण परिस्थितीचे वास्तववादी चित्रण केले आहे.

४) मनोहर माळगावकर यांची दुसरी कादंबरी 'अ बेंड इन दि गँगीज' (१९६४) म्हणजे फाळणीमुळे उद्भवलेल्या परिस्थितीवरील एक महाकाव्य आहे. ही कादंबरी म्हणजे भारतीय स्वातंत्र्यलढा अन् स्वातंत्र्यप्राप्तीनंतरचे क्रूर वादळ याचे विदारक चित्रण आहे. देशाच्या फाळणीकडे नेणारी भारतातील राजकीय स्थिती, स्वातंत्र्यलढा, अहिंसातत्त्व फाळणीनंतरच्या सीमेच्या पेटलेल्या दोन्ही बाजू अन् या सर्वात सर्वसामान्य माणसांची झालेली फरफट. या सर्व गोष्टींचे मनोवेधक विस्तृत चित्रण या कादंबरीत आहे. ग्यान व देवी हे दोन मित्र प्रमुख पात्रे व त्यांच्या मैत्रीतील चढउतार पहायला मिळतात. ग्यान व देवी दोघेही अगदी भिन्न प्रवृत्तीचे व विचारसरणीचे अन् म्हणून दोघेही एकमेकांपासून दुरावतात. अर्थात् स्वातंत्र्यलढा व फाळणी यामुळे निर्माण झालेली परिस्थिती यास कारणीभूत आहे. हे सर्व चित्रण अत्यंत वाचनीय आहे. फाळणीनंतरच्या उद्रेकात देवी लाहोरला आपल्या माता-पित्यांना मदत करण्यासाठी व त्यांना सुखरूप भारतात आणण्यासाठी जातो ;परंतु दुर्दैवाने तेथेच मुस्लिमांकडून मारला जातो. लाहोरमधून निर्वासित छावणी व भारताकडे प्रयाण असा प्रवास करत असतानाच देवीच्या आईलाही मारले जाते. देवीचे वडील मृत्यूची वाट पहात लाहोरलाच रहायचे ठरवितात; त्यामुळे ग्यानलाही देवीच्या माता- पित्यांना सीमेपलीकडून इकडे सुखरूप आणता येत नाही. शेवटी ग्यानदेवीच्या बहिणी-बरोबर एकटाच इकडे येतो. स्वातंत्र्याचा आनंद व फाळणी-नंतरचे क्रौर्य याचा विचार ग्यानला अस्वस्थ करतो. त्याच्या मनात विचार येतो 'भारताला हे स्वातंत्र्य हवे होते का?' हाच का तो स्वातंत्र्याचा सूर्योदय?, माळगावकर कादंबरीचा शेवट एका प्रश्नाने करतात 'स्वातंत्र्याची किंमत कुणी अन् किती मोजायची?, कादंबरी वाचल्यानंतर निर्माण होणारी अस्वस्थता निदान यापुढे जातिधर्माच्या नावावर एकमेकांचे गळे धरणाऱ्या लोकांना शहाणे करील. इतिहासातून धडे घेऊन शहाणे व्हायचे असते, पण त्यासाठी इतिहासात भोगलेल्या यातना किती भयानक व अविचारातून उद्भवलेल्या होत्या, याची जाणीव इतरांना व्हायला हवी असते. ही जाणीव साहित्यच निर्माण करू शकते.

५) चमन नहाल यांची 'आजादी' (१९७५) ही कादंबरी म्हणजे फाळणीनंतरच्या उद्रेकाचे मन सुन्न करणारे चित्रण आहे. सीमेपलीकडील उफाळलेले मृत्यूचे थैमान व सर्वसामान्य, निष्पाप नागरिकांचे झालेले हाल, त्यांच्या यातना: हे वाचून मन अस्वस्थ होते. नहाल यांनी काही कुटुंबांचे चित्रण केले आहे . त्यातही लाला काशीराम यांच्या कुटुंबावर लक्ष केंद्रित केले आहे. आज पाकिस्तानमध्ये असलेल्या सियालकोट येथील लाला काशीराम हा एक सधन, सुखवस्तू व्यापारी. देशाला स्वातंत्र्य मिळाले, पण त्याचबरोबर सीमाभागात जातीय दंगलीची सुनामी लाट आली. फाळणी जाहीर झाली अन् आपली पत्नी, मुलगा व काही शेजारी यांच्यासह आपले घरदार, मालमत्ता सोडून लाला काशीरामास निर्वासित छावणीकडे जीव वाचविण्यासाठी जावे लागते. फाळणी-नंतरच्या जातीय दंगलीत स्वत: चमन नहाल हे होरपळून निघाले आहेत. स्वानुभव आणि सूक्ष्म निरीक्षण यामुळे फाळणीनंतरच्या कत्तलीचे विदारक वर्णन कादंबरीत दिसते. शेवटी नहाल एकच संदेश देतात 'द्वेष सोडा व सामंजस्याने रहा.' खूप यातना सहन करून व सर्वस्व गमावूनही लाला काशीराम कुणाला दोष देत नाही. अविचारातून उद्भविलेली भयानक परिस्थिती स्वीकारल्याशिवाय सर्वसामान्यांना पर्याय नसतो. सर्वकाही स्वीकारून हताश न होता परिस्थितीशी जुळवून घेऊन पुन: उभे राहायचे असते. हीच आयुष्यात तडजोड

असते. हेच काशीरामच्या विचारांतून जाणवते. नहाल हे फाळणीनंतरच्या पुनर्वस-नातील समस्यांचाही उहापोह करतात.

६) आरिया हुसेन यांची 'सनलाईट ऑन अे ब्रोकन कॉलम' ही कादंबरी म्हणजे वसाहतवाद, भारतीय स्वातंत्र्यलढा व स्वातंत्र्यानंतरची परिस्थिती याचे विवेचन आहे. या सर्व परिस्थितीत लैला ही वीस वर्षांची, त्याच वयाच्या मुलीची विधवा आई झालेली आहे. तत्कालीन सामाजिक व राजकीय स्थितीचे चित्रण कादंबरीत आहे. लखनौ शहरात हे सर्व घडते. खरे तर, फाळणीच्या उद्रेका-पासून लखनौ दूर आहे. पण फाळणीचे चटके फक्त सीमाभागातच नव्हे; तर देशात सर्वदूर सर्वांना बसले; हेच दिसते. लैलाच्या दोन भावांपैकी एकजण पाकिस्तानात जाणे पसंत करतो; तर दुसरा भारतातच राहतो. वादळानंतर सारे शांत होते सर्वसामान्य जीवन पुनःसुरू होते.

७) भीष्म सहानी यांची 'तमस' ही कादंबरी १९७४ मध्ये प्रथम हिंदीत प्रकाशित झाली. नंतर १९८१ मध्ये 'काईट्स् विल फ्लाय' नावाने इंग्रजीत प्रकाशित झाली. याच कादंबरीची सुधारित आवृत्ती, जाई रतन यांनी इंग्रजीत भाषांतरित केलेली १९८८ मध्ये प्रकाशित झाली. या कादंबरीस साहित्य अकादमी पुरस्कार मिळाला. तसेच यावर चित्रपटही निघाला. ही कादंबरी फाळणीवरील नाही परंतु जातीय दंगलीमधून होणारा विध्वंस व त्यातील क्रौर्य यांचे चित्रण यात आहे. सामंजस्य, सलोखा व शांतता हेच जातीय दंगलींना उत्तर आहे. इतिहासातून धडा घेऊन यापुढे तरी आपण शहाणे व्हावे असे; दिशादर्शक चित्रण यात आहे. साहित्य वाचकाला आनंद देते. त्याबरोबरच जीवनाचे धडे देते. दर्जेदार साहित्यकृती म्हणजे समाजातील मार्गदर्शक दीपस्तंभ असतात. फाळणीवरील साहित्याचे मूल्य म्हणूनच स्थल, कालातीत आहे. धर्म, पंथ, जात देश यापलीकडे जाऊन परस्पर सामंजस्याने, प्रेमाने एकत्र राहणे हेच केवळ जीवनाचे ध्येय असावे. परंतु धर्मांधता व स्वार्थ यामुळे माणसे हे सर्व विसरतात. क्रूर होतात. अन् समाजातले माणूसपण संपते. जगातील सर्व निर्मितीमागे ईश्वर आहे 'Tiger, Tiger burning bright. Did He who made thee, make a lamb?' हे लिहिताना हाच विचार केला असावा. ईश्वरनिर्मित जगात ईश्वराच्या प्रार्थनेचा सर्वोत्तम मार्ग कोलरीजने आपल्या 'राईट ऑफ द अॅन्शिएंट मरीनर' या कवितेत दिला आहे. He prayeth best who loveth best; all things great or small created by God!' हे सर्व समजण्यासाठी समाजाचे भान राखण्यासाठी समाजातील विसंगत घटनांवर साहित्यकृती निर्माण होणे गरजेचे असते. या इशाऱ्यामुळेच पुढील पिढी शहाणी होत असते.

*प्राचार्य पद्माकर पुंडे*
*साईदत्त रेसिडन्सी, बी, बिल्डिंग, ए विंग, फ्लॅट नं. २३,*
*मेन रोड, बाणेर, पुणे - ४११०४५.*

■

## . विष्णू विनायक बोकील

(२जून १९०३ ते २२एप्रिल १९७३)

१९३० ते ६०च्या दरम्यान विशेषत: विनोदी लेखनाने लोकप्रिय झालेले विष्णु विनायक तथा वि.वि.बोकील पुण्याच्या नू.म.वि.मध्ये शिक्षक होते. कथाकार आणि कादंबरीकार म्हणून त्यांची ओळख आहे. 'कटू सत्य' या कथेने त्यांनी साहित्यक्षेत्रात पदार्पण केले. वि.वि.बोकील हे स्वभावाने मिष्कील होते. तीच त्यांच्या लेखनाची शैली झाली. 'दोन तरूण आणि दोनच तरुणी' 'वाट चुकलेले नवरे' या कादंबऱ्यावरील चित्रपट लोकप्रिय झाले.

प्रारंभीच्या काळात त्यांच्या कादंबऱ्या सामाजिक प्रश्न आणि प्रणयभावना यांनी प्रभावित होत्या. झंझावात (१९४०) चल पुढे ( १९४४) आबा (१९४४), बेबीची बहीण (१९४५) कुबेर की रंक (१९४५), तू तिथं मी (१९४६) मायेची शाल (१९४९) या सुरुवातीच्या कादंबऱ्या होत. 'तारांबळ' (१९४२) लगीनघाई (१९४३) ही कादंबऱ्याची नाट्यरुपांतरे आहेत. श्री.बोकील यांच्या जन्मशताब्दीला दोन वर्षे होऊन गेली असली तरी त्यांच्या चाहत्यांनी म.सा.परिषेदेच्या सहकार्यांनी जन्म शताब्दी करण्याचे ठरविले आहे. त्या निमित्ताने हा परिचय देणे उचित वाटते.



अनुक्रमणिका

# समतेची सम्यक् गाथा गाणारी आशयगर्भ 'वज्रमूठ'

प्राचार्य डॉ.भगवान ठाकूर

'वज्रमूठ' हा पत्रकार- कवी डी.बी.जगतपुरीया यांचा अन्वयार्थक शीर्षक असलेला संग्राह्य, विचारप्रवर्तक कवितासंग्रह आहे. बाणेदार शब्द सैनिकाच्या वज्रमुठीतून धारण केलेल्या अक्षरांच्या वैचारिक बाणासारखी टोकदार व धारदार लेखणी दृग्गोचर करणारे, या संग्रहाचे मुखपृष्ठच, आशयाचा जो प्रकाशोन्मुख निर्भय स्वर आहे, त्यास एखाद्या अग्रदूतासम दर्शविते.

कृतज्ञेताचा जागर घालणारी अर्पण पत्रिका, कवीचा हा दुसरा सशक्त काव्यसंग्रह. ठिणगीने कवीची आंबेडकरी जाणीव उजागर केली तर ' वज्रमूठ ' समस्त शोषित - दलित कष्टाकऱ्यांच्या हक्काचा जाहीरनामाच घेऊन प्रकटली. हा कवी क्रांतीप्रवण जाणिवांचा, प्रकाशमार्गी बुलंद आशावाद बाळगणारा, शब्दांच्या धारदार शस्त्राने अन्याय, विषमतेचे विषारी तण नेस्तनाबूत करू पाहणारा आहे. फुले-शाहू आंबेडकरांच्या वर्णांतासह मार्क्सच्या वर्गांताचा विचारही कवीच्या मनात भक्कम रुजला आहे. साम्यवादी विचारांच्या लालगर्द खुणा प्रस्थापित व्यवस्थेला बदलून नवा समताधिष्ठीत लोकशाही समाजवाद प्रस्थापित करण्याचे कवीचे स्वप्न त्याच्या अनेक कवितांमधून दिसते. साम्यवादी लाल क्रांतिकारी जाणिवांच्या असंख्य खुणा या आशयगर्भ कवितेत आढळतात. विलक्षण राजकीय उपहास, उपरोध कवीच्या शव्दाशब्दातून मुद्रांकित होतो. मूलतत्त्ववाद्यांचा धार्मिक फार्स, राजकीय गणगवळण, सामाजिक समरसतेचे संमोहन हे आर्थिक, सांस्कृतिक शोषणाचे गारुड कवीच्या वज्रप्रहारांचे मुख्य विषय आहेत.

हा कवी शब्दांची पूजा बांधतो. तो माणसाचं गीत गाण्यासाठी, कष्टकऱ्यांची महती सांगण्यासाठी प्रतिमा व प्रतीकांची फुलं वाहतो ती समतेची. न्यायाची प्रस्थापना व्हावी म्हणून कवीचा निदिध्यास आहे. वेदाआधी असलेल्या माणसाचे श्रेष्ठत्व प्रस्थापित करणाऱ्या सर्व महामानवांना कवी वंदनीय मानतो. 'शिका, संघटित व्हा, संघर्ष करा ' या आव्हानमूल्यांची कवीच्या मनाची एक बंडखोर मूस घडविली आहे. हे मन जिथं जिथं मानवी मूल्यांचे अवमूल्यन होताना पाहते, त्याची 'वज्रमूठ' आपोआप एल्गारासाठी सज्ज होते.

*कष्टकऱ्यांना भरडणाऱ्या सैतानी टोंचेचा*
*हिशोब मागा*
*संघर्षाची वज्रमूठ उभारा*
*त्यांना दाखऊन द्या*
*त्यांची योग्य जागा !' (पृ. ११)*
*असे म्हणणारा हा कवी जेव्हा,*
*उगारायलाच हवी*
*प्रखर प्रतिकाराची वज्रमूठ*

असे आवाहन करतो; तेव्हा त्याच्या मनातला अन्यायाविरुद्धचा लाव्हा उसळून वर येतो. मनापासून आणि प्रत्येक मनात चैतन्याची युगवात लावू पाहणारा कवी उत्थानाचे चक्र फिरवण्यासाठी एकीचा हात द्यायला सांगतो. सहवेदना आणि संवेदना असलेला कवी आपल्या एका कवितेत म्हणतो-

सरणाच्या ओझ्याखाली- मी मरण पाहिले होते.
झळ सोसून पर दु:खाची- मी मलाच जाळत आलो.
असे म्हणणारा हा कवी-
बळकट बाहू आता स्फुरू दे
आणि फोड पाषाण
वृक्षाच्या त्या भात्यामधुनी
काढ जरा तो प्राण !

असेही म्हणतो तेव्हा इथल्या निष्प्राण क्षीणांना जगण्याचं बळ देणारी ही कविता आहे, हे जाणवते. कवितेच्या क्रान्तदर्शी सामर्थ्यावर कवीचा विश्वास आहे. कविताच मनातला महातिमिर छेदून प्रकाशाचं तीर गाठेल (१९) असा कवीचा दृढ विश्वास आहे. शब्द शस्त्रापेक्षाही तीक्ष्ण असतात. म्हणूनच कवी म्हणतो,

'शब्दांच्या घणाने
मस्तवाल वाकवता येतो !
मशाल पेटली की
अंधारही फाकवता येतो.

किंवा-

शब्दांशी या माझ्या नाती
शब्दांची वीज माझ्या हाती
शब्दांचा हा सूर्यसोहळा
शब्दांचे नभ माझ्या हाती

किंवा-

तुझ्यासाठी
धैर्याचा डंख
साहसाचे पंख
गर्जनेचा शंख

या ओळीही वाचकाला अंतर्मुख करणाऱ्या आहे. या संग्रहात कवीने रचनाबंधाचे विविध प्रयोग केले आहेत. गझल, विस्फोटिका या शीर्षकाच्या विद्रोहरसाची अभिव्यक्ती करणाऱ्या चारोळ्या, मुक्त छंद, भावकाव्य, राजकीय उपहासिका, आईच्या थोरविका, बहिणाबाईच्या गाण्यांची आठवण करून देणारी 'माणसास' सारखी रचना इत्यादी र.कृ.जोशी यांची आठवण होईल असा 'कर्णरूण' कवितेचा रचना बंध इ. हे सर्वच पदबंध पूर्णपणे शुद्ध वा शास्त्रीय पद्धतीने जमले आहेत असे नव्हे. परंतु त्यातून आशय अभिव्यक्त करण्याची कवीच्या प्रांजळपणाची ऊर्मी व्यक्त होते. त्यातूनच युद्ध भूमीच्या कविता या शीर्षकाची गोळीबंद रचना साकार होते. त्यातूनच आईच्या थोरविका शीर्षकाच्या काव्यात कवी म्हणतो-

मातेऽ
तुझी काही औरच
बात
तुझ्या क्षमावंत
डोळ्यात करूणेची
विश्ववात !
मस्तकावर सदैव
असू दे आशिर्वादाने
भारलेला तुझा
करुणाघन हात.

यासारख्या आशयघन ओळी आईचा गौरव वाढवतात. तशी जगत्पुरियांची कविता प्राधान्याने मुक्त छंदातील वृत्त, छंद, मात्रावृत्त, अक्षरगणवृत्त इ.ची जाचक बंधने न मानवणारी ही आशयसुंदर कविता. पण मुक्तछंदालाही स्वत:चा एक अंगभूत छंद, लय, नाद असतोच 'मल' सारखी एखादी कविता विचार सौंदर्यासोबत सौंदर्यही लेवून येते. उदा. राजकीय उपरोध विडंबन विरोधाभास हे या कवीच्या काव्याचे एक शक्तीकेंद्र आहे.

'दैन्याचे घेऊन दाणे
तो शोषित दळतो आहे.
दु:खाने उन्मळणारा
मज भारत कळतो आहे (पृ.३८)

अशी ही बहुआयामी कविता मनाला भुरळ घालते. एकूण जगत्पुरियांची कविता या हृदयीचे त्या हृदयीशी संवाद साधते आहे. सभोवतीच्या सामाजिक, राजकीय, आर्थिक, सांस्कृतिक आणि आर्थिक घटना - घटितांमुळे ते अस्वस्थ होतात. कधी क्रोधित होतात. कधी तळमळतात तर कधी व्यथित होतात. प्रतिकृतीची, प्रतिकाराची क्रांतिकारी संहिता प्रसवू लागतात. पण एक तोटाही होतो. त्यांच्या कविता वहिर्मुखवृत्तीच्या वाटतात. मनात दीर्घकाळ एखाद्या घटना घटितांचे चिंतन मंथन होऊन तत्वविचारांचे जे गंभीर रसायन काव्यरुपात अवतरायला हवे ; तसे काही कवितांबद्दल होत नाही. तात्कालिक स्वरूपांच्या प्रांजळ प्रतिक्रिया असेच त्या कवितांचे स्वरूप राहते. मात्र असे असले तरी हा प्रांजळपणा एकढा सच्चा असतो की तो काव्य रसिकाच्या काळजाला सरळ हात घालतो. वर्गांताच्या जाणिवांपासून सुरू झालेला कवी जाणिवांचा प्रवास वर्णांताच्या, सम्यक् परिवर्तनाच्या आंबेडकरी जाणिवांपर्यंत विकास पावतो. आणि बुद्ध-फुले-शाहू-मार्क्स आंबेडकर अशा समस्त महापुरुषांच्या प्रज्ञेचा पायिक म्हणून हा कवी आपल्या शब्दांशी इमान राखतो. वाचक या संग्रहाचे मन:पूर्वक स्वागत करतील, याचा विश्वास वाटतो.

समीक्षक

***डॉ. भगवान ठाकूर***

*प्राचार्य, वाडिया कॉलेज, पुणे- ४११००१*

**वज्रमूठ**
कवी: डी.बी.जगत्पुरीया
प्रकाशक
**वीणा प्रकाशन**
२४, गणेश कॉलनी, जळगाव,
फोन नं.(०२५७) २२५१५३९

■







अनुक्रमणिका

# ते दान त्या क्षणांचे !

टी.एन्.परदेशी

अरुण शेवते संपादित 'ते दान त्या क्षणांचे' या पुस्तकात अठ्ठावीस लेखांचा समावेश आहे. आयुष्याची दिशा बदलून टाकणारे, त्यात आमूलाग्र परिवर्तन घडवून आणणारे, सांगणारे हे लेख आहेत.

पं.रविशंकर, हृदयनाथ मंगेशकर, गुलज़ार, सुधा मूर्ती, केलुचरण महापात्रा अशा विविध क्षेत्रातील वीस दिग्गजांनी त्यांच्या आयुष्यातील अशा परिवर्तनशील क्षणांविषयी लिहिले आहे.

सुरेशचंद्र वारघडे, व्यंकटेश माडगूळकर, मं.गो राजाध्यक्ष, द्वारकानाथ संझगिरी अशा लेखकांनी इतरांविषयी लिहिलेल्या आठ लेखांचा समावेश या पुस्तकात आहे.

दैव किंवा नशीब बलवत्तर असणं, नियतीचं दान अनुकूल पडणं, प्रयत्नांची पराकाष्ठा आणि त्या जोडीला आत्मविश्वासानं घेतलेले निर्णय अचूक ठरणं, य़ामुळं काही जणांच आयुष्य उजळून जातं. आयुष्याला विलक्षण गती प्राप्त होते. निसर्गदत्त प्रज्ञेला आणि प्रतिभेला बहर येतो. हा बहराचा ऋतु उत्तरोत्तर फुलतच जातो. त्यांच्या अस्तित्वाभोवतालचा आसमंत सुगंधित होत जातो. विश्वाच्या पसाऱ्यात कोठेतरी अंधुकपणे लुकलुकणाऱ्या एखाद्या निस्तेज चांदणीचं रुपांतर क्षणार्धात लखलखत्या ताऱ्यात होतं. अशा घटना पूर्वापार घडत आलेल्या आहेत. पूर्वीच्या काळी एखाद्या राजाच्या मृत्यूनंतर गादीला वारस नसल्यास हत्तीच्या सोंडेत फुलांची माळ देऊन त्यास राजधानीतून फिरवीत असत. हत्ती ज्याच्या गळ्यात माळ घाली तो राजा होत असे. अनाथ असलेला आणि उज्जैनच्या वेशीवर द्वारपाल म्हणून काम करत असलेला, परंतु पुढे शककर्ता व पराक्रमी सम्राट म्हणून ख्यातकीर्त झालेला विक्रमादित्य अशा पद्धतीनेच तेथील राजगादीचा वारसदार म्हणून निवडला गेल्याची कथा आहे. या पुराणकथांना कपोलकल्पित म्हणावे तर मानवी आयुष्यात अनेकदा कल्पिताहूनही विलक्षण अशा घटना घडत असल्याचे आपण अनुभवतो.

इटलीतील एका सर्वसामान्य घराण्यातील मुलगी सोनिया, राजीव गांधीच्या प्रेमात पडते काय आणि नेहरु-गांधी घराण्याची सून म्हणून भारतात येते काय हे सारेच विलक्षण आहे. सोनिया व राजीव त्यांच्या पहिल्या दृष्टी भेटीतच परस्परांच्या प्रेमात गुंतले. एका मित्रांच्या मध्यस्थीनं घडून आलेल्या त्या क्षणाने सोनियाच्या आयुष्यावर व त्याबरोबरीने खंडप्राय भारत देशाच्या राजकारणावर दूरगामी परिणाम झाले.

गीतकार, कथा-पटकथा लेखक, दिग्दर्शक म्हणून हिंदी सिनेमावर आपला वेगळा ठसा उमटविणाऱ्या गुलजार यांना साहित्याची आवड होती. परंतु सिनेमात यायचे नव्हते. शैलेन्द्र यांना विमलदांच्या 'बंदिनी' ची गाणी लिहिणं काही शक्य नसल्यानं एका मोटार गॅरेजमध्ये काम करणाऱ्या गुलजार यांना त्यांनी बळजबरीने विमलदांकडे पाठविले. 'विमलदांनी मला उत्तेजन दिले. तो क्षण माझ्या मनात स्थिरावला. रिकाम्या भांड्यात पाण्याचा एक थेंबदेखील वाजतो. तसा तो क्षण माझ्या मनात निनादला. असं त्या क्षणाविषयी गुलजारांनी लिहिलं आहे.

पं.रविशंकर विरक्त होऊन आत्महत्या करायला निघाले होते. त्यावेळी त्यांच्या जीवनात ढाढबाबा नावाचे आध्यात्मिक क्षेत्रातील एक महापुरूष आले. त्याक्षणी रविशंकर यांच्या जीवनाने नवीन वळण घेतले.

अभियांत्रिकीचं पदव्युत्तर शिक्षण घेणाऱ्या एका विद्यार्थीनीनं थेट जे.आर.डी.टाटांना एक पत्र लिहिले. 'टाटांचं घराण एवढं सुधारक आणि महिला अभियंत्यास मात्र नोकरीची संधी टाटांकडे नाही. असं कसं?' या अर्थाचं ते पत्र एका पोस्टकार्डवर लिहिलं होत. त्या मुलीस टेल्कोत नोकरी मिळाली. ती टाटांकडील पहिली महिला इंजिनियर तिचं नाव सुधा मूर्ती ! सध्या एक लाख कोटी रुपयांहून अधिक मालमत्ता असणाऱ्या 'इन्फोसिस' या जगप्रसिद्ध कंपनीची महानिर्माती !

अशा अनेक विलक्षण गोष्टी या पुस्तकात आहेत. त्यात महात्मा गांधीची शिष्या म्हणूंन व्रतस्थ जीवन जगलेल्या मॅडेलीन स्लेड या जन्माने फ्रेंच व नंतर मीराबेन म्हणून प्रसिद्धीस आलेल्या युवतीच्या जीवनात परिवर्तन घडविणाऱ्या घटनेचं चित्रण करणाऱ्या कथा आहे. ब्राझिल-मधील कॅथरीन-द-जीजस या दुसरी इयत्ता शिकलेल्या, उकिरड्यातील कागद-कपटे बाटल्या गोळा करून उदरनिर्वाह करणाऱ्या एका स्त्रीच्या तपशिलवार परंतु अनागर भाषेत लिहिलेल्या दैनंदिनीच्या वह्या एका पत्रकाराच्या हातात गेल्या व कॅथरीन रातोरात 'स्टार लेखिका' झाली. मंगेश पाडगावकर, आचार्य अत्रे, आरती प्रभू आणि रणजित देसाई या साहित्यिकांनी त्यांच्या काही प्रसिद्ध कलाकृतींच्या निर्मितीच्या क्षणांविषयी लिहिले आहे. सलीम अली नावाच्या एका तरूण मुलाचं जगप्रसिद्ध पक्षीतज्ज्ञात रूपांतर केलं ते एका इवल्याशा पीतकंठी चिमणीनं! याशिवाय खेळडूंच्या, संशोधकांच्या, चित्र-कारांच्या गोष्टी आहेत. वैज्ञानिक शोधांच्या संदर्भातले योगायोग आहेत.

'ते दान त्या क्षणांचे' हे पुस्तक अशा रीतीने माणसाच्या जीवनात काही ना काही परिवर्तन घडवून आणलेल्या क्षणांचे विविधांगी दर्शन घडविते. पुस्तक एकदा हाती धरले की शेवटचे पान वाचून होईतो हातून सुटत नाही. परंतु या दोन गुणवैशिष्ट्याशिवायही या पुस्तकातून आपणास काहीतरी भरीव असे मिळते. हे पुस्तक वाचकांना थोडी प्रेरणा व थोडा बोधही देते.

अरूण शेवते यांचे याआधीचे 'नापास मुलांची गोष्ट' हे पुस्तक 'बेस्टसेलर' ठरले आहे. दहावी बारावीच्या स्तरावरील अपयशामुळे उद्ध्वस्त होऊन मनोरूग्णतेच्या अवस्थेप्रत जाऊ पहाणाऱ्या लोकांना त्या पुस्तकाने उभारी दिली. पालकांच्या व विद्यार्थ्यांच्या त्या पुस्तकावर उड्या पडल्या. त्यानंतरच्या शेवते संपादित 'हाती ज्यांच्या शून्य होते' या पुस्तकानेही तरूण विद्यार्थ्यांना उमेद दिली. प्रस्तुत 'ते दान त्या क्षणांचे' या पुस्तकाची जातकुळी उपरोक्त दोन पुस्तकांहून वेगळी असली तरी संस्कारक्षम व उमलत्या वयातील तरूणाईस प्रेरणा देण्याचे काम हे पुस्तक करील यात शंका नाही.

'एक विषय' घेऊन त्याभोवती फेर धरण्याचा अरूण शेवते यांचा स्वभाव आहे. त्यांची सर्व कविता ही मालिका कविता आहे. 'ऋतुरंग' हा दिवाळी अंक व त्यांनी संपादित केलेली बहुतेक पुस्तके यातून शेवते यांचे आवडते 'एका विषयाचे' वैशिष्ट्य व्यक्त होते. दिवाळी अंकासाठी शेवते एक विशिष्ट विषय विचारपूर्वक ठरवितात; आणि त्यासाठी सर्व थरांतील लेखकाची जाणीवपूर्वक निवड करतात. खास धाटणीची अशी त्यांची ही संपादन प्रक्रिया आहे. क्वचित् एखादा अपवाद वगळता त्यांच्या दिवाळी अंकाची भट्टी नेहमी चांगलीच जमून आली आहे. दिवाळी अंक पुस्तकासारखे संग्रही ठेवले जात नाहीत. संग्राह्य अंकाचीही वर्तमानपत्रासारखी रद्दी होते. दिवाळी अंकातील लेखांचे पुन्हा संपादन करून शेवते त्यांचे पुस्तकरूपाने स्वतःच्या ऋतुरंग प्रकाशनातर्फे प्रकाशन करतात. त्यांनी संपादित केलेली अशी अनेक पुस्तके इतर प्रकाशनांनीही प्रसिद्ध केलेली आहेत. पुनः प्रत्ययाचा आनंद आणि सुलभ संग्राह्यता असे दोन उद्देश या पुस्तकांमुळे साध्य होतात.

प्रस्तुत 'ते दान त्या क्षणांचे' हे पुस्तक मात्र 'ऋतुरंगच्या' एखाद्या दिवाळी अंकातील लेखांचे संपादित पुस्तक नाही. एक वाचक म्हणून विविध विषयांवरील पुस्तकांचे वाचन करीत असताना शेवतेमधील जागृत संपादकाची आवड-निवड चालू असते. 'एक धागा- एक सूत्र' यांच्या अनुषंगाने शेवते विविध ठिकाणाहून समरूप व एकरूप रंगांच्या, सौंदर्याच्या व सुगंधाच्या फुलांना गोळा करून त्यांची सुंदर माळ तयार करतात.

अरूण शेवते मुळात कवी असल्याने त्यांच्या ह्या सर्वच पुस्तकांची शीर्षकंही काव्यमय असतात. प्रस्तुत पुस्तकासाठी त्यांनी मंगेश पाडगावकरांच्या कवितेतील एक ओळ चपखलपणे वापरली आहे. मूळ कविता अशी आहे

...' ते दान त्या क्षणाचे घेता मला न आले
उधळून प्राण माझे देता मला न आले '

पुस्तकातील लेखांच्या सकारात्मक आशयामुळे पाडगावकरांच्या कवितेतील शब्दांचा शीर्षक म्हणून भावार्थही सकारात्मक झाला आहे.

**टी.एन.परदेशी**

*'गुंफण', शाळा नं १६ जवळ, बुरुडगाव रस्ता, अहमदनगर-१*

**ते दान त्या क्षणांचे**

संपादन - श्री. अरुण शेवते

'ऋतुरंग' प्रकाशन, साईबाबा कॉम्प्लेक्स, गोरेगाव, मुंबई- ४०००६३

■

# 'छांदस' - विशुद्ध आनंदाचा प्रत्यय

डॉ. कांचन पाडगावकर

स्वातंत्र्योत्तर काळात मराठी कवितेवर मुक्तछंदाचा प्रभाव सतत राहिला. किंबहुना मुक्तछंदाच्याही पलिकडे जाऊन गद्यशैलीचा स्वीकार कवी प्रकृतींना विशेष भावला. अशा मुक्तछंद-गद्यछंदाच्या अर्धशतकाच्या शेवटी 'छांदस' कवितेचा जन्म हा पुन: एकदा मराठी मध्ययुगीन कवितेशी आपले नाते जोडणारा आहे. गेल्या अर्धशतकापासून मराठी कवितेच्या प्रांतात आपली स्वतंत्र भावमुद्रा उमटवणारी सुहासिनी इर्लेकर यांची 'छांदस' मधील कविता गीत नाही. पण छांद आहे. मुक्तछंद नव्हे; तर गद्य छंदातच अभिव्यक्त होणाऱ्या या काव्यप्रवाहात 'छांदस' कविता संपली आहे असे वाटत असतानाच सुहासिनी इर्लेकर यांची छांदसनिष्ठा 'छांदस' मधील कवितेतून व्यक्त झाली आहे. सामर्थ्यवान प्रतिमा पुंजातील ही छंद-कविता अधिक वेधक होते. तिला तिचा नाद आहे, लय आहे व तिचा असा खास डौल आहे. या छंदाच्या संदर्भात कवी वसंत बापट म्हणतात की, 'छंद म्हणजे बंध नव्हे, छंद म्हणजे आनंद, मनात उमटलेल्या बकुळफुलांचा सुगंध. निदान 'छांदस' मधल्या कवितांची ही जन्मकहाणी आहे.'

कविता संग्रहाच्या सुरुवातीला आमुख म्हणून ज्या आठ ओळी आल्या आहेत त्यात कवयित्री म्हणते,

'मिटवून टाक न मोरा -
जांभळे निळे संमोहन ।
व्याकूळला देहकिनारा -
प्राणांत मौन ओठंगून ।'

मोर, जांभळे-निळे संमोहन, व्याकूळला देहकिनारा या प्रतिमांतून अथांग प्रेम भावाचे सूचन होते. मात्र हा प्रेमभाव तिने व्यक्त केला का त्याने? प्रश्नांकीत ठेवणेच कवयित्री पसंत करते. या ठिकाणी गतस्मृतींचे ते प्रेममय सुंदर संमोहन या सांजवेळेस न आठवलेलेच बरे. आता देहकिनाराच व्याकूळ, प्राणांत मौन भिजलेले, आता वेळच परतीची, इथे ही जन्म कहाणी उलगडू नकोस असे सांगत असतानाच प्रेम कहाणीच सांगितली जाते. ज्या प्रेम कहाणीची नायिका स्वत: कवयित्रीच असते. ही प्रेम कहाणी म्हणजे आत्मशोध असतो. त्रयस्थ होऊन घेतलेला. त्रयस्थपणाने हा आत्म-शोध घेताना जे जाणवले, आवडले त्याचाच प्रांजळ मनाने केलेला आविष्कार म्हणजे ही इर्लेकर यांची छांदस कविता आहे.

'छांदस' च्या संदर्भात आपली भूमिका व्यक्त करताना कवयित्री इर्लेकर मॅडम म्हणतात, 'साहित्यात त्यातही कवितेत कालसापेक्षतेने नवे आवेगी प्रवाह सातत्याने प्रकटतात; आणि कवितेचे अनुभवविश्व तसेच काव्यविषयक जाणिवांच्या कक्षा विकसित करून कालांतराने विश्रांत पावतात. अखेर उरते ती कविता केवळ... विशुद्ध आणि सोलीव कविता. मग ती छांदस असो वा मुक्त. आपल्यातील भावऐश्वर्य प्रकट करणे हाच तिचा सनातन अस्तित्वहेतू.' आपले भावऐश्वर्य प्रकटणारी ही विशुद्ध भावकविता छांदस आहे. त्यांची ही छांदसवृत्ती बालवयापासून जोपासली गेली. १९४२-४३ चा काळ प्रक्षोभक, स्वातंत्र्य आंदो-लनाचा, वीरशक्तीने सळसळलेला. स्वातंत्र्याचा मंत्र ओठात घेऊन रसरशीत झालेला. सोलापूरला कवयित्रीचे बालपण गेले. राष्ट्रसेवादलातील देशभक्तीपर गीतांचा प्रभाव या संवेदनशील मनावर झाला. साने गुरुजी, वसंत बापट, कुंजविहारी आदींच्या राष्ट्रभक्तीपर कवितेने भारावलेल्या या जगाशी कवयित्रीचे आंतरिक नाते कधीच जुळून गेले. पुढे संतकवितेच्या संशोधनाभ्यासात, त्या अक्षय अमृतघन कवितेचा ऋणानुबंध; हेच कवयित्रीचे संचित झाले.

मराठीतील मध्ययुगीन काव्याभिव्यक्ती ही छांदसमध्येच आहे. संत ज्ञानदेव, संत नामदेव, संत चोखोबा, संत गोरा कुंभार, संत सावता माळी, संत एकनाथ, संत तुकाराम यांची अभंगरचना, नाथांचे भारुड छांदसच होते. ही अभंग-कविता नाद, लय, मात्रावृत्त घेऊनच व्यक्त झाली. गीत नसूनही गीताच्या प्रकृतीजवळ गेलेल्या या रचनेला टाळ मृदंगाची जोड मिळाली. या प्रेरणेतून व्यक्त झालेली ही



अनुक्रमणिका

विशुद्ध भावकविता चिरसुंदर व चिरंजीव झाली.

आधुनिक मराठी कवितेच्या प्रवाहात कवी अनिलांनी मुक्तछंदाचा पुरस्कार केला. मात्र मुक्तछंदातील ही कविता छांदसच होय. या मुक्तछंदातील कवितेने आधुनिक मराठी कवितेवर केलेले संस्कार, तिची ठसठशीत विशुद्ध भावमुद्रा निर्माण करून गेले. १९८० नंतर मात्र मराठी कवींनी मुक्त-छंदालाही मागे टाकून गद्यछंदालाच जवळ केले. गद्यछंदा-तील या कवितेने 'कविते'चे स्वत्त्वच जवळ जवळ संपुष्टात आणले.

छांदसमधील कविता मात्रावृत्ताच्या कुठल्या प्रकारात तंतोतंत बसत नसली तरी ती मात्रावृत्तातीलच आहे. या कवितेच्या रचनेचा मात्रावृत्त हा केंद्रबिंदूच आहे. या कवितेच्या चरणात अक्षरांचे व गणांचे बंधन नसून केवळ मात्रांचे बंधन आहे. 'अथांतर', 'ह्या नदीच्या पार', 'आले फुलांचे दिवस', 'गोपू', 'कालावकाश', 'आठवते', 'मी', 'विद्रोही', 'समजावण', 'अशी एकदा', 'तू तिथे येथे जरी मी', 'गुणगुणून', 'ती अजून येते जाते' अशा मात्रावृत्तातील कविता आहेत. 'सोसवेना आता', 'जेथे जावे तेथे', 'अर्ध्या वाटेवर', 'आले उमजून', 'किती प्यावा ग प्रकाश', 'मी वितळावे', 'बीज रुजले रुजले', 'आले उदरी आभाळ', 'मी तो घननीळ', या कविता अभंग छंदातील आहेत. गीत, चित्र, संगीत, नृत्य याची अभिजात जाण कवयित्रीला आहे. त्यामुळे कवयित्रीची कविता शब्दभावचित्र घेऊन अभिव्यक्त होते. तिला लाभलेले छांदपण असे जन्मजातच आहे. त्यामुळे ते अस्सल आहे.

'छांदस' मधील छांदस या प्रकृतीतून व्यक्त झालेली कविता प्रीतीच्या विविध भावछटा व्यक्त करणारी. मात्र ही प्रीती लौकिक-अलौकिक, द्वैत-अद्वैत, भास-आभास यांच्या परस्पर द्वंद्वातून भावाकाश व्यक्त करणारी. मात्र ही प्रीती लौकिक प्रणयभावातील प्रतीक्षा, आतुरता, भेट, वियोग, वंचना अशा भावच्छटांची अभिव्यक्ती कवयित्री-च्या 'छांदस' मध्ये नाही. इथे भूत, वर्तमान, भविष्य या कालप्रवाहातील प्रेमभाव हाच केंद्रीभूत आहे.

आता इथून पुढती, 'मी', 'आठवते', 'हळवा सायंतारा', 'तोवर', 'डोळे तुझे असे की', 'आले फुलांचे दिवस', 'तुझ्या माझ्या अबोल्यात' छांदसमधील या प्रेमकविता तृप्त-प्रीतीचे भावचित्र रेखाटणाऱ्या आहेत. प्रतीक्षा, वियोग, हुरहूर, व्याकूळणे, या प्रणयभावाच्या छटा 'हळवा सायंतारा' सारख्या एखाद्याच कवितेतून व्यक्त होतात. प्रेमानुभावाचे चित्रण निसर्ग प्रतिमेतूनच होते. इथे निसर्गानुभव व प्रेमानुभव हा एकमेकात इतका गुंतलेला असतो की, या दोहोंना परस्परातून वेगळे दाखवणे अवघडच असते. बऱ्याच वेळेस प्रेमानुभावातच निसर्गानुभव व निसर्गानुभवातच आध्यात्मिक अनुभवाचा साक्षात्कार होतो.

काजव्यांचे घुमत राहणे, घननीळ चांदण्या हसणारी पाचूची राने, पाण्यातील सतार, करवंदाची धुंद जाळी, गुलमोहोरास वेढणारी स्पर्शलाजरी वेल, सचैल नग्न हिरवळ, डोंगर माथ्यावरची चंद्रमाधवी नक्षी, नभाच्या निळ्या जांभळ्या साक्षी, तिची कमळवेल होणे, वंशवनातून घुमणे, हळवा सायंतारा, गर्भार केळ, चंद्रफुलाची नक्षी, कर्पुरी वेणा, आंबेवनातील मोर, फुलांचे दिवस, डोळ्यांतील मोर या निसर्गप्रतिमांतून प्रीतीच्या भावावस्थांचे सूचन होते. गतकाळ, वर्तमानकाळ नि भविष्यकाळ यांची सांगड घालणारी ही प्रेमानुभूती परिपक्व, सखोल आणि चिरंतन भावजीवनाची ठेव असते. स्मृतींचा उजाळा देऊन भविष्यकाळात आपण राहू की नाही ही भेडसावणारी साशंकता प्रेमिकांच्या भावमनाला भिजरी करते. व्याकूळ करते, अमोल करते.

'असे किती -
सांगू तुला?
शब्द, मौन -
धरून आहेत!
परतीच्या
प्रवासाचे -
क्षण फक्त
उरले आहेत.!'
('क्षण' पान क्र. ८०)

किंवहुना कवितेतील प्रेमिकेचे नाते हे मुळी अलौकिकाशी जडलेले आहे. त्यामुळे ही प्रेमिका त्या एका अलौकिकाच्या पातळीशी अशी भिडून गेलेली आहे की, तिच्या प्रेममय जगण्यात अलौकिकाच्या भावखुणा प्रतीत होत राहतात. अशा अलौकिकाशी नाते जोडणारी ही प्रेयसी पुनः त्याचवेळी या लौकिक भावजीवनाची स्वप्नभूल होऊन वावरत असते. त्यामुळे एकाचवेळी लौकिक आणि

अलौकिक असा तिचा भावप्रवास असतो.

खोळ बुंथी निर्गुणाची आणि छंद सगुणाचा असा तो दयाघन.त्याच्या सर्वव्यापी अस्तित्वाची खूण पटल्याची ही आनंदतृप्त जाणीव इर्लेकर यांच्या तुडुंब तृप्त मनाला सहस्त्र कोटी सूर्याचा उजाळा देऊन प्रकटते. राधा काय, मीरा काय या ज्या प्रीतीची भाषा - बोलतात; त्याच प्रीतीची भाषा इर्लेकर मॅडम ह्याच्या असतात.

'बघ चांदण्याला
तुझा परिमळ -
मी तो घननीळ
झाले आता!'
(पान ६९)

इर्लेकर यांच्या कवितेतील अद्वैतभाव त्यांच्या अभिजात प्रतिभा शक्तीची साक्ष सतत पटवत असतो. 'छांदस' रचनेला पुनरुज्जीवित करणारी 'छांदस' मधील कविता विशुद्ध आनंदाचा प्रत्यय देणारी आहे. या भाषेला अभिजात श्रीमंती डौल प्राप्त झालेलाच आहे. त्यापेक्षाही तिचे भावऐश्वर्य ठाशीव, सोलीव अंतरीची खूण पटविणारे आहे.

डॉ. कांचन पाडगावकर
प्रपाठक, संशोधन मार्गदर्शक
*सुरेशगड, दत्तनगर, नवगण कॉलेज रोड, बीड - ४३११२२*
*दूरभाष : (०२४४२) २३१६७*

'छांदस'
सुहासिनी इर्लेकर
सुमती प्रकाशन
४९/२ ज्ञानेश सोसायटी, वारजे माळवाडी, पुणे - २९

■





अनुक्रमणिका



# विद्रोही साहित्याचे जनक - बाबूराव बागूल

प्रा.अजय देशपांडे

साहित्यकृतीतील सारी स्पंदने टिपणे हे समीक्षेचे कार्य असते. साहित्यकृतीचे महत्त्व मानवी मूल्यांच्या दृष्टीने अधोरेखित करण्याचे कार्य समीक्षा करीत असते. साहित्यकृती ज्या मातीतून उगवते, त्या मातीच्या सर्जनशीलतेशी समीक्षकांच्या मनाचे रक्तसंबंध जुळले तरच समीक्षा सम्यक् चिकित्सेचे कार्य पूर्ण करते. समीक्षेच्या संदर्भात 'नवे साहित्य शास्त्र' या ग्रंथात डॉ.यशवंत मनोहर यांनी सुरेख विवेचन केले आहे. ते लिहितात, '' समीक्षा ही मानवी स्वभावाचाच मूलभूत भाग आहे. अनुकूल वा प्रतिकूल प्रतिक्रिया व्यक्त करण्याची अखंड शृंखला म्हणजेच माणसाचे जीवन होय. या अर्थाने श्वासोच्छवासाइतकीच समीक्षा ही मानवी जीवनात अपरिहार्य आहे. साहित्यसमीक्षेने साहित्यकृतीची सम्यक् म्हणजे परिपूर्ण चिकीत्सा केली पाहिजे...काही सर्वसामान्य सौंदर्यमूल्यांच्या आधारे साहित्याची तपासणी केली पाहिजे. अवलोकन, आस्वादन, गुणदोषदर्शन, मूल्यमापन हे समीक्षेचे कार्य आहे. एक कलाकृती म्हणून साहित्यकृतीच्या दर्जास समीक्षकाने सोदाहरण स्पष्ट करण्याची गरज असते. साहित्यकृती वर्तमानात जन्म घेते; पण हा वर्तमान भूतकाळाच्या पोटातून आलेला असतो आणि वर्तमान पोटात मानवी जीवनाचे भविष्यही वागवीत असतो, ही संपूर्ण संदर्भचौकट समीक्षेने ध्यानी बाळगून आपला निर्णय द्यायचा असतो...साहित्य समीक्षेने आशय आणि अभिव्यक्तीची शैली आणि तिचे सौंदर्य विशद केले पाहिजे. साहित्यकृतीचे मानवी मूल्यांच्या दृष्टीने महत्व सांगितले पाहिजे. केवळ वाचकांनाच नव्हे तर साहित्यिकांना जीवनाच्या नव्या आणि मूलगामी पर्यावरणाची अचूक कल्पना देऊन एका गांभीर्याची, सुजाणतेची पर्यायाने प्रज्ञानाची (wisdom) वृद्धी करणे हे समीक्षेचे कार्य आहे.'' (नवे साहित्यशास्त्र पृष्ठ २०५) या दृष्टीने समीक्षेचे कार्य हे युगप्रवर्तक असते. समीक्षेच्या युगप्रवर्तक कार्याची सम्यक् जाणीव डॉ.सुखदेव ढाणके यांच्या समीक्षा लेखनाला आहे. 'बाबूराव बागूल : व्यक्ती आणि वाङ्मय' या ग्रंथात डॉ.सुखदेव ढाणके यांनी ज्येष्ठ साहित्यिक बाबूराव बागूल यांच्या वाङ्मयाची सम्यक् चिकित्सा केली आहे.

'बाबूराव बागूल : व्यक्ती परिचय, जडणघडण प्रभाव' या पहिल्या प्रकरणात बाबूराव बागूल यांच्या लेखनामागील प्रेरणांचा शोध डॉ.ढाणके यांनी घेतला आहे. ''बुद्धाच्या करुणेत, मार्क्स, लेनिन, स्टॅलीन यांच्या समाजपरिवर्तनाच्या चळवळीत डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांच्या विचारधारेत, गोर्की, चेकॉव्ह, मायकोव्हस्की, नेरूदा यांच्या क्रांतिकारी साहित्यात, श्रमिकांच्या श्रमात दलित समाजाच्या दैन्य, दास्य आणि दुःखात, शंबूक, एकलव्य यांच्या बहिष्कृत व्यक्तिरेखात बागुलांची लेखनामागील प्रेरणा दडलेली आहे (पृष्ठ १२) बाबूराव बागूल यांचे व्यक्तिमत्त्व त्यांच्या जीवनजाणिवा, त्यांचा लेखनप्रवास, त्यांच्या व्यक्तिमत्त्वावरील आणि लेखनावरील वैचारिक प्रभाव यांचा वेध पहिल्या प्रकरणात डॉ.ढाणके यांनी घेतला आहे.

'बाबूराव बागूल यांची कथा' हे दुसरे प्रकरण नवकथेची आणि दलितकथेची वैशिष्ट्ये विशद करून या दोहोंचा तौलनिक विचार या प्रकरणात प्रारंभी केला आहे. बंधूमाधव, अण्णा भाऊ साठे, शंकरराव खरात, सुखराम हिवराळे, केशव मेश्राम, योगीराज वाघमारे, योगेन्द्र मेश्राम, अभिताभ, वामन होवाळ, यांच्या कथांचा आणि एकूणच दलित कथेच्या देदिप्यमान प्रवाहाचा आढावा घेऊन डॉ.ढाणके यांनी बाबूराव बागूल यांच्या कथांचे वेगळेपक्ष विशद केले आहे. 'बाबूराव बागूल यांच्या कथेने मराठी कथेला नवे भान दिले. नवे परिमाण दिले. नवा आशय व नवी प्रतिभासृष्टी दिली. त्यामुळे बागूल यांच्या कथेला वेगळेपण प्राप्त झाले आहे. गावाकुसाबाहेरील दलित, आदिवासी, भटक्याविमुक्त, लोकांचा जीवनस्तर बागूलांनी कथेतून उलगडून दाखवला आहे. त्यांच्यातील आंतरवादळे, जीवनासाठीचा त्यांचा पराकोटीचा संघर्ष, त्यांच्या असीम यातना, त्यांची दुर्धर दुःखे, त्यांची प्रखर भूक-बागूलांनी प्रथमच मराठी कथेत प्रभावीपणे मांडली आहे(पृष्ठ ४४) असे मत मांडून डॉ.ढाणके 'बाबूराव बागूल यांची कथा नवकथेचा पुढचा टप्पा आहे हे साधार सिद्ध करतात. बाबूराव बागूल यांची कथा नवकथेचा पुढचा टप्पा आहे हे



अनुक्रमणिका

मान्य करावे लागते. नवकथेच्या ऐन बहराच्या काळात गाडगीळ, गोखले यांनी मनोविश्लेषण, संज्ञाप्रवाह यावर भर देणाऱ्या मानवी मनाचा पट, हळूवारपणे उलगडून दाखविणाऱ्या कथा लिहिल्या. तर जी.ए. यांनी माणूस आणि अतींद्रिय शक्ती यांच्यातील संबंध दाखविणाऱ्या कथा लिहिल्या. माणूस नियतीच्या हातचे बाहुले आहे हे जी.एं.नी त्यांच्या कथातून सांगितले आहे. परंतु वर्णवर्ग, जाती, धर्म यात पिचत-पीडत असलेल्या समाजाच्या खालच्या स्तरातील माणसांचा विचार गाडगीळ, गोखले किंवा जी.ए.करीत नाहीत. त्यांची कथा उच्च मध्यम-वर्गीयांच्या भोवती वेटोळे घालून त्यांच्या सुखदुःखाची गाऱ्हाणी सांगत बसली. या जीवनापलीकडे आणखी एक जीवन आहे. ते खडतर आहे शापित आहे' शोपित-पीडित वंचित आहे, मूलभूत अधिकार डावलेले आहेत, त्यांनाही भावना आहेत, सुखदुःखे आहेत याचा विचार बागूलांच्या कथेने सर्वप्रथम केला (पृष्ठ ४७,४८) असा निष्कर्ष नोंदवून बाबूराव बागूल यांच्या कथेतील आशय, अभिव्यक्ती, आविष्कार, आकृतिबंध, शैली, भाषा आदींचे वेगळेपण डॉ.ढाणके यांनी अधोरेखित केले आहे. बाबूराव बागूल यांच्या कथांच्या निर्मितीमागील प्रेरणा, कथांचे स्वरूप, आणि या कथांची बलस्थाने सांगताना आंबेडकरी साहित्यप्रवाहातील या कथेचे स्थान व महत्त्वही डॉ.ढाणके यांनी साधार विशद केले आहे.

'बाबूराव बागूल यांची कादंबरी' या प्रकरणात बागूलांच्या कादंबरी लेखनाचा आढावा घेतला आहे. बागूलांच्या कादंवरी लेखनांची सामर्थ्ये सांगताना त्यांच्या मर्यादांचेही विवेचन तटस्थपणे केले आहे.

'बाबूराव बागूल यांची कविता' या प्रकरणात डॉ.ढाणके लिहितात, "बागूल बुद्धाच्या जडवादी तत्त्वज्ञानाचे पुरस्कर्ते आहेत. विज्ञानवादी दृष्टिकोनातून बागूल, देव, धर्म व संस्कृतीची चिकित्सा करतात. बुद्ध, फुले, आंबेडकर ही त्यांची प्राणतत्त्वे होत. गोर्की, चेकॉव्ह, मायकोव्हस्की, शरच्चंद्र, प्रेमचंद, राहुल सांकृत्यायन, मुल्कराज आनंद, सरदार जाफरी यांच्या वाङ्मयाचा सामायिक परिणाम त्यांच्या वैचारिकतेवर झालेला आहे. तसाच तो त्यांच्या काव्यलेखनावरही झालेला आहे. बागूल खऱ्या अर्थी विद्रोहाचे जनक! हा विद्रोह प्रथम त्यांच्या कवितेतून आणि नंतर त्यांच्या अन्य गद्य लेखनातून प्रवाहित झालेला आहे. बागुलांची कथा विद्रोहाची जननी आहे असे दलित कथेच्या समीक्षकांनी म्हटले असले तरी बागूलांच्या विद्रोहाचे मायपोट कविता हेच आहे. कारण बागूल आधी कवी आहेत आणि नंतर कथा, कादंबरी आणि वैचारिक लेखक आहेत. तेव्हा बागुलांची कविताच खऱ्या अर्थी 'विद्रोहाची जननी' आहे. क्रान्तीकल्लोळाची वाहिनी आहे. ती परिवर्तनाचे अस्त्र आहे. मानवमुक्तीचे शस्त्र आहे.(पृष्ठ १५०)असे बागुलांच्या कवितेचे विचारवैभव या प्रकरणात उत्कटतेने सांगितले आहे. 'तत्त्वज्ञकवी' म्हणून बागुलांची नव्याने ओळख या प्रकरणात करून दिली आहे.

बागूल यांनी केलेल्या चरित्रात्मक लेखनाचा आढावा घेऊन या लेखनाची वैशिष्ट्ये एका प्रकरणात नमूद केली आहेत.

'बाबूराव बागूल यांचे समीक्षालेखन' या प्रकरणात मराठीतील समीक्षालेखनाच्या प्रवृतींचा आढावा घेतला आहे. सौंदर्यवादी, जीवनवादी, सैद्धांतिक व उपयोजित समीक्षा प्रवाहांची नेमकी वैशिष्टये टिपली आहेत. दलित समीक्षेचा प्रवाह, या समीक्षा प्रवाहाची वैशिष्ट्ये सांगून त्या पार्श्वभूमीवर बाबूराव बागूल यांच्या समीक्षेचे स्वरूप विशद केले आहे. 'दलित साहित्यः आजचे क्रांतिविज्ञान' हा बागूलांचा ग्रंथ दलित साहित्याचा 'बीजग्रंथ' ठरावा असे

निष्कर्ष नोंदविले, बागूलांच्या समीक्षा लेखनाची सामर्थ्यस्थाने डॉ. ढाणके मार्मिकपणे दाखवितात. बागूलांच्या समीक्षेचा केन्द्रबिंदू माणूस आहे. माणसाला बागूलांनी क्रांतीचा उद्‌गार मानले आहे. विज्ञानवादी विचारवंत आहेत, बुद्धाचा विज्ञानवादी दृष्टिकोन बागूलांच्या समीक्षालेखनातून प्रकट होतो. 'भूक' या विश्वजाणिवेचे प्रकटीकरण हाही बागूलांच्या समीक्षेचा विषय आहे. भुकेच्या मुळाशी अस्पृश्यता व आर्थिक शोषण आहे. असा बागूलांचा निष्कर्ष आहे'' (पृष्ठ २०४, २०५) असे कितीतरी निष्कर्ष मार्मिकपणे डॉ.ढाणके नोंदवितात.

'बाबूराव बागूल यांचे वैचारिक लेखन' हे शेवटचे प्रकरण बाबूराव बागूल यांचे सामाजिक, राजकीय, धार्मिक विचार आणि साहित्यविषयक विचारांचा आढावा घेतला आहे. 'जेव्हा मी जात चोरली होती' या कथासंग्रहाच्या शेवटी बागूल यांचे स्वगत आहे. हे स्वगत बागूलांच्या तत्त्वचिंतनाचे सार आहे. हे डॉ.ढाणके यांनी साधार सांगितले आहे. बागूलांच्या वैचारिक लेखनाचे विचारसौंदर्य व युगप्रवर्तकत्व येथे तटस्थपणे विशद केले आहे.

डॉ.सुखदेव ढाणके यांचा हा ग्रंथ म्हणजे जेष्ठ साहित्यिक बाबूराव बागूल यांच्या आजवरच्या लेखनाची मार्मिक चिकित्सा होय. या ग्रंथाचे वैशिष्ट्य असे की बाबूराव बागूल यांच्या समग्र साहित्याची चिकित्सा करीत असताना डॉ.ढाणके समकालीन आणि पूर्वीच्या वाङ्मयीन प्रवाहांची साहित्यप्रकारांची अन्वर्थक चिकित्सा करतात. दलित साहित्य प्रवाहाचीही चिकित्सा करतात. आणि या चिकित्सेच्या कॅनव्हासवर बागूलांच्या साहित्याचे अवलोकन, आस्वादन, गुणदोषदर्शन आणि मूल्यमापन करतात. साहित्य सामाजिक जीवन, राजकीय स्थिती, आर्थिक स्थिती या साऱ्यांचा वेध घेत बागूलांच्या साहित्यकृतींच्या निमित्ताने समकालीन साहित्याची ही मीमांसा करतात. हे सारे करताना डॉ.ढाणके यांची दृष्टी सर्वसमावेशक राहते. त्यामुळे त्यांचे समीक्षालेखन माणूसकेंद्री, मानवतावादी बनले आहे. सोपी आणि सुबोध भाषा, नेमकी आणि नेटकी वाक्यरचना हे डॉ.ढाणके यांच्या लेखनाचे आणखी एक वैशिष्ट्य आहे. समीक्षक समाजशिक्षक असतो. समीक्षकाची समाजशिक्षकाची भूमिका आणि जबाबदारी डॉ.ढाणके यथोचितपणे पार पाडतात. समीक्षेच्या युगप्रवर्तकतत्वाची प्रगल्भ जाण त्यांच्या लेखनातून ठिकठिकाणी दिसते. आंबेडकरी साहित्यसमीक्षा आणि डॉ.बाबूराव बागूल यांच्या वाङ्मयावरील समीक्षा लेखनास नवे परिमाण प्राप्त करून देणारा डॉ. ढाणके यांचा ग्रंथ आहे.

(संदर्भ :
डॉ.यशवंत मनोहर 'नवे साहित्यशास्त्र', विजय प्रकाशन,नागपूर)

लेखक- प्रा.अजय देशपांडे
वामनघाट मार्ग, हनुमाननगर, वणी -४४५३०४.
जि.यवतमाळ

परीक्षण ग्रंथ
बाबूराव बागूल - व्यक्ती आणि वाङ्मय
डॉ. सुखदेव ढाणके
स्वरूप प्रकाशन, औरंगाबाद

■










अनुक्रमणिका

# महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे

कार्यवृत्त ( ऑक्टो. २००६ ते मार्च २००७ )

डॉ.वि.भा.देशपांडे (प्रमुख कार्यवाह)

१) ९ ऑक्टोबर २००६ - प्रसिद्ध कथाकार, नाटककार, प्रा.विद्याधर पुंडलीक यांच्या स्मरणार्थ श्री.सुरेशचंद्र पाध्ये यांच्या उपस्थितीत पारितोषिक समारंभ साजरा झाला. औरंगाबादचे डॉ.त्र्यंबक महाजन यांच्या 'नाट्यधर्मी मराठवाडा' या ग्रंथास पुरस्कार देण्यात आला. अध्यक्षस्थानी डॉ. गं.ना.जोगळेकर होते.

२) १० ऑक्टोबर, २००६- कै.दत्तो वामन पोतदार यांच्या नावे असलेला ऐतिहासिक ग्रंथलेखनाचा पुरस्कार रवीन्द्र गोडबोले यांच्या 'सम्राट अकबर' या ग्रंथास दिला गेला. प्रमुख पाहुणे दै.लोकमत वृत्तपत्राचे संपादक श्री.अनंत दीक्षित.

३) ७ नोव्हेंबर २००६- कवी केशवसुत यांच्या स्मृति-दिना-निमित्ताने नेहमीपेक्षा वेगळा म्हणजे प्रा.विठ्ठल वाघ यांच्या मुलाखतीचा कार्यक्रम आयोजित केलेला होता. मुलाखत-कार होते प्रा.मिलिंद जोशी आणि कवी उद्धव कानडे. कवी विठ्ठल वाघांनी आपल्या उत्तराच्या ओघात अनेक कवितांची पेशकारी केल्याने कार्यक्रमाला रंगत आली.

४) २९ नोव्हेंबर २००६ - कै.माधव जूलियन यांच्या स्मृतिप्रीत्यर्थ गझलकारांचे संमेलन आयोजित केले होते. त्यामध्ये पुढील कवींचा सहभाग होता.

इलाही जमादार, रमण रणदिवे, प्रदीप निफाडकर, दीपक करंदीकर, घन:श्याम धेंडे, डॉ.सतीश डुंबरे, चित्तरंजन भट, सौ.शीला वैष्णव, राजेन्द्र जोशी, अविनाश सांगोलेकर, सुभाष पवार इत्यादि. अध्यक्षस्थानी सौ.संगीता जोशी होत्या. प्रा.मिलिंद जोशी आणि राजेन्द्र जोशी यांनी सूत्रसंचालन केले.

५) डिसेंबर २००६- नाटक विभागाच्या वतीने एकांकिका लेखन स्पर्धा जाहीर केली होती. त्यात ६५ एकांकिका आल्या होत्या. त्या स्पर्धेचा पारितोषिक वितरण समारंभ प्रसिद्ध नाटककार सतीश आळेकर यांच्या हस्ते साजरा झाला. श्री.सचिन काळे, सौ.भारती पांडे आणि रमेश वाकनीस यांना पारितोषिके प्रदान करण्यात आली. उत्तेजनार्थ पारितोषिके ह.शि.खरात, श्रीपाद सुपनेकर, अरविंद थोरात यांना दिली गेली. परीक्षक म्हणून डॉ.अजय जोशी, प्रसन्नकुमार अकलूजकर यांनी काम पाहिले. त्यांनी आपले मनोगत व्यक्त केले. अध्यक्षस्थानी डॉ. गं. ना. जोगळेकर होते.

६) ७ डिसेंबर २००६ - अ.भा.साहित्य संमेलनाचे नियोजित अध्यक्ष श्री.अरुण साधू यांचा पहिला सत्कार सोहळा प्रा. द.मा.मिरासदार यांच्या अध्यक्षतेखाली संपन्न झाला. डॉ.वि.भा.देशपांडे आणि डॉ.न.म.जोशी हे दोघे वक्ते म्हणून बोलले. डॉ.सतीश देसाई यांनी आभार मानले. प्रा.मिलिंद जोशी यांनी सूत्रसंचालन केले. पुण्यातील विविध संस्थांकडून श्री.साधू यांचा सन्मान केला गेला.

७) २८ डिसेंबर २००६- हास्यकविसंमेलन हा एक वेगळा कार्यक्रम सादर करण्यात आला. प्रेक्षकांचा उत्तम प्रतिसाद लाभला. संमेलनात कवी प्रकाश पाठारे, उद्धव कानडे, रवी पाईक, चंद्रकांत वानखेडे इ.नी भाग घेतला.

८) १० जानेवारी २००७ - नवनिर्वाचित नाट्य-संमेलनाध्यक्ष श्रीमती लालन सारंग यांचा पुण्यातील पहिला जाहीर सत्कार, ज्येष्ठ गायिका-अभिनेत्री श्रीमती जयमालाबाई शिलेदार यांच्या हस्ते करण्यात आला. दोघींची समयोचित भाषणे झाली. याच सभेत नटवर्य दाजी भाटवडेकर यांच्या निधनाबद्दल डॉ.जोगळेकरांनी परिषदेच्या वतीने शोक व्यक्त केला. सत्कार समारंभानंतर श्रीमती सारंग यांची मुलाखत वि.भा.देशपांडे यांनी घेतली. सारंगबाईंनी आपल्या नाटकातील काही स्वगते सादर केली. सूत्रसंचालन डॉ.माधवी वैद्य यांनी केले.

९) ११ जानेवारी २००७ - प्रसिद्ध कथा, कादंबरीकार, वि.स.खांडेकर यांच्या स्मृतीनिमित्त त्यांच्या 'ययाति' कादंबरीच्या काही भागांचे अभिवाचन केले. डॉ.माधवी वैद्य, डॉ.वृषाली पटवर्धन, राहुल घोरपडे आणि गौतम बापट यांनी सहभाग घेतला.

१०) १८ जानेवारी २००७ - श्रेष्ठ न्यायमूर्ती कै.महादेव

गोविंद रानडे यांच्या स्मृतिप्रीत्यर्थ न्या.प्र.ना.वेहेरे यांचे व्याख्यान झाले. विषय होता 'न्यायमूर्ती रानडे- व्यक्ती आणि न्यायाधीश' अध्यक्षस्थानी डॉ.गं.ना.जोगळेकर होते.

११) २७ जानेवारी २००७ - म.सा.प.ने यंदापासून जे नवे कार्यविभाग आरंभित केले आहेत, त्यामध्ये बालांसाठी एक विभाग सुरू केला. त्याचा आरंभ ज्येष्ठ समाजसेविका, बालवाङ्मय लेखिका, श्रीमती रेणू गावस्कर यांच्या उपस्थितीत झाला. या कार्यक्रमात भारती निवास सोसायटीच्या बालरंजन केन्द्रातर्फे 'पुस्तकं रुसली' ही नाटिका पेश केली. त्यानंतर रेणू गावस्करांनी कथाकथन केले. अक्षरबाग ही 'अक्षरहंडी' फोडली. बालरंजनच्या माधुरी सहस्त्रबुद्धे या प्रसंगी उपस्थित होत्या. त्यांचाही सत्कार करण्यात आला. डॉ.माधवी वैद्य आणि प्रा.मिलिंद जोशी. यांनी कार्यक्रमाचे सूत्रसंचालन केले.

१२) २७ फेब्रुवारी २००७ - कवी कुसुमाग्रज यांचा स्मृतिदिन संपन्न झाला. या निमित्ताने कॉन्टिनेंटल प्रकाशन-च्या वतीने प्रायोजित पुरस्कार श्री.प्रकाश किनगावकर यांच्या 'गावाच्या आकाशाभोवती' या काव्यसंग्रहास दिला गेला. अध्यक्षस्थानी डॉ.अश्विनी धोंगडे होत्या.

१३) २६ फेब्रुवारी २००७ - स्वातंत्र्यवीर सावरकरांच्या स्मृतिदिनानिमित्ताने डॉ.विश्वास मेंहेदळे यांचे व्याख्यान झाले. विषय होता 'स्वा.सावरकर व्यक्ती आणि विचार' अध्यक्षस्थानी डॉ.जोगळेकर होते. त्यांनीही या विषयावर आपले विचार मांडले. आभार प्रा.मिलिंद जोशी.

१४) २८ फेब्रुवारी २००७ -'राष्ट्रीय विज्ञान दिन' याचे औचित्य साधून प्रसिद्ध संगणक तज्ज्ञ डॉ.दीपक शिकारपूर यांचे 'संगणकक्षेत्राची भरारी' या विषयावर सोदाहरण भाषण झाले. त्यानंतर श्रोत्यांची प्रश्नोत्तरे झाली.हा कार्यक्रम मराठी विज्ञान परिषदेच्या सहभागाने घेतला. या परिषदेचे म.ना.गोगटे आणि श्री.पानसे यांनीही आपली मनोगते व्यक्त केली.

१५) २० मार्च २००७ - प्रसिद्ध लेखिका श्रीमती जोत्स्ना देवधर यांनी पुरस्कृत केलेला 'शरदचंद्र चटोपाध्याय लेखिका पुरस्कार' सांगलीच्या डॉ.तारा भवाळकर यांना प्रदान करण्यात आला. या निमित्ताने डॉ.मृणालिनी गडकरी यांनी शरदबाबूंच्या साहित्यावर सखोल विचार मांडले. पुरस्कारप्राप्त डॉ.भवाळकरांनी आपल्या लेखनासंबधीचे विचार व्यक्त केले.

१६) २४ मार्च २००७ -२००६ एप्रिलपासूनच्या वर्षातील देणगीदारांचा मेळावा आयोजित केला होता. असा उपक्रम प्रथमच घेण्यात आला. देणगीदारांचा प्रतिसाद उत्तमप्रकारे लाभला. श्री.अनंत जोशी यांनी अपार कष्ट घेऊन याचे आयोजन केले होते. त्यांनी प्रास्ताविक आणि कृतज्ञता व्यक्त केली. काही देणगीदारांनी आपली मनोगते सांगितली. श्रीमती मीनाक्षी केळकर यांनी ५१हजारांची देणगी आणल्यावद्दल त्यांचा विशेष सत्कार करण्यात आला. डॉ.देसाई, डॉ.वि.भा.देशपांडे यांनी समारोपाची भाषणे केली. श्रीमती नंदा सुर्वे यांनी सूत्रसंचालन केले. अल्पोपहाराचा आस्वाद घेऊन हा मेळावा संपन्न झाला.

१७) २६ मार्च २००७ - ज्येष्ठ कादंबरीकार लेखक-श्री.ना.पेंडसे यांचे २३ मार्च रोजी निधन झाले. त्यांना म.सा.प.च्या आणि साहित्यप्रेमीजनांच्या वतीने आदरांजली अर्पित करण्यात आली. त्यामध्ये श्रीमती लालन सारंग, डॉ.वीणा देव, डॉ.माधवी वैद्य, रत्नाकर कुलकर्णी, वि.भा.देशपांडे, डॉ.जोगळेकर, बर्वे यांनी आपले विचार मांडले.

१८) २९ मार्च २००७ - इतिहास संशोधक शं.ना.जोशी यांच्या नावे असलेला महत्वपूर्ण पुरस्कार डॉ.सदानंद मोरे यांच्या 'लोकमान्य ते महात्मा' या ग्रंथासाठी देण्यात आला. श्री.मोहन धारिया प्रमुख पाहुणे म्हणून उपस्थित होते. पुरस्कार प्रदानानंतर डॉ.मोरे आणि श्री.धारिया यांची भाषणे झाली.

यावर्षी जन्मशताब्दी असलेल्या साहित्यिकांच्या स्मृतिनिमित्त का.र.मित्र व्याख्यानमाला आयोजित केली. दि.१३-३-२००७ ज्येष्ठ विनोदी लेखक कै.श्यामराव ओक -मराठी विनोदाचा बदलता चेहरा-सौ.मंगला गोडबोले, दि.१४-३-२००७ कवी कै.सोपानदेव चौधरी -जन्म कवितेचा डॉ.अरुणा ढेरे, दि.१५-३-२००७ कै.गोपीनाथ तळवलकर-आजचे बालसाहित्य : स्वरूप.डॉ.लीला दीक्षित,दि. १६-३-२००७ कवी कै.रा.अ.काळेले, रा.अ.काळेले : व्यक्ती आणि कृती,डॉ.मो.गो.धडफळे, दि.१७-३-२००७ज्येष्ठ नाटककार कै.मो.ग.रांगणेकर, मो.ग.रांगणेकर यांचे मराठी रंगभूमीवरील योगदान, डॉ.वि.भा.देशपांडे.

वरील बहुतांशी कार्यक्रमांचे सूत्रसंचालन डॉ.माधवी वैद्य आणि प्रा.मिलिंद जोशी यांनी केले.

# शाखावृत्तांत

## शाखा - अहमदनगर

माहे जानेवारी २००७ ते मार्च २००७ या कालखंडात अहमदनगर शाखेने पुढील कार्यक्रम केले.

कुसुमाग्रजांच्या जन्मदिनी त्यांच्या साहित्याच्या अभिवाचनाचा कार्यक्रम साजरा झाला. नाट्य, पत्रकारिता, काव्य, आत्मचरित्र इ. प्रतिभेचा आढावा घेतला. या कार्यक्रमात अध्यक्ष डॉ. सुधा कांकरिया यांच्यासह प्रा. मेधा काळे, डॉ. धोंडिराम वाडकर, डॉ. चं. वि. जोशी, सौ. शर्मिला गोसावी, टी. एन्. परदेशी, श्री. भास्करराव डिक्कर, डॉ. क्रांतिकला अनभुले प्रभृतींनी भाग घेतला.

श्री. चंद्रकान्त देशमुख यांच्या 'मृत्युदंड' या एकांकिका लेखनास महाराष्ट्र राज्याचा पुरस्कार मिळाल्याबद्दल त्यांचा सत्कार आयोजित केला. 'आपली व्याख्यानमाला' चे आयोजन केले. पाच विविध क्षेत्रातील व्यक्तींची व्याख्याने आयोजित केली.

डॉ.सुधा कांकरीया
अध्यक्ष

---

## शाखा - सोलापूर

अध्यक्ष- कवी श्री.दत्ता हलसगीकर
उपाध्यक्ष- श्री.नागेश सुरवसे,श्री. पद्माकर कुलकर्णी
कार्यवाह- श्री.व्यंकटेश नुले , प्राचार्य डॉ. प्रेमचंद मेने
कोषाध्यक्ष- श्री.बाबूराव मेंदर्गीकर
सदस्य-श्री.अरविंद जोशी, डॉ.सुरेश करंदीकर, श्री. योगीराज वाघमारे, श्री.अवधूत ममाणे श्री.जगदीशचंद्र कुलकर्णी, प्रा.संजय लांडगे, सौ.शोभना सागर, श्री.ए.बी.मुल्ला
स्वीकृत सदस्य- श्री.माधव पवार, सौ.सीमा होसूरकर
(निर्वाचन अधिकारी- श्री.मोहन दाते व श्री.प्रशांत बडवे)

२) कै.बा.सी.मर्ढेकर स्मृतिदिन- डॉ.राजेंद्र बीडकर यांचे व्याख्यान

३)म.सा.प.सोलापूर शाखा व सोसायटी ऑफ इंडियन रेकॉर्डस कलेक्टर सोलापूर शाखावतीने महाकवी कालिदास दिन प्रा.डॉ.सुहास पुजारी यांचे व्याख्यान-श्री.मोहन सोवनी व श्री.जयंत राळेरासकर यांनी 'पाऊसगाणी' कार्यक्रम सादर केला.

४) सोलापूरतील कविराय राम जोशी, कवी कुंजविहारी कवी रा.ना.पवार, कवी संजीव यांच्या निवासस्थानावर नीलफलके लावली.

५) कै.अण्णा भाऊ साठे-व्यक्ती आणि वाङ्मय- मान.योगीराज वाघमारे यांचे व्याख्यान

६) आचार्य अत्रे जयंती- श्री.न.म.जोशी यांचे व्याख्यान (प्रायोजक कै.वा.ग.काटकर यांचे चिरंजीव)

७)१०/२/२००७ - भरतेश गांधी स्मृतिप्रीत्यर्थ सुलेखन स्पर्धा.

८)११/२/२००७ - शोभा देशपांडे यांच्या 'पुनर्जन्म' कादंबरीचा प्रकाशन समारंभ प्रा. कराळे (कराड) यांच्या हस्ते, कवी दत्ता हलसगीकर यांच्या अध्यक्षतेखाली सेवासदन सभागृहात झाला.

९)२७/२/२००७ - मराठी मायबोली दिनानिमित्त लेखक श्री. रवींद्र पिंगे यांच्याशी साहित्यिक गप्पागोष्टी झाल्या.

१०) २५/३/२००७- श्री. ना. पेंडसे यांना श्रद्धांजली कार्यक्रम कार्यवाह मेने यांच्या निवासस्थानी झाला. सहभाग - कवी हलसगीकर डॉ. सुहास पुजारी, अरविंद जोशी, श्री. व्यंकटेश नुले, सौ. श्रुतिश्री वडकबाळकर इ. सहभागी झाले.

| | |
|---|---|
| प्राचार्य प्रेमचंद मेने | डॉ.सुहास पुजारी |
| कार्यवाह | कार्याध्यक्ष |

---

## शाखा - शहापूर

सहाव्या वर्षात पदार्पण.

प्रा. अरुण मैड यांचे व्याख्यान. सौ. अनुराधा शेळवले आणि श्री. संदेश ढगे यांच्या काव्यसंग्रहाचे प्रकाशन, कार्याध्यक्ष - श्री. सूर्यकांत देशमुख यांचे प्रास्ताविक, सौ. विभा काळे यांच्या कथाविविधाचा कार्यक्रम. श्रीमती उषा रायवाणी यांना डॉक्टरेट पदवी प्राप्त झाल्याबद्दल सत्कार. उपाध्यक्ष श्री. प्रशान्त फुले व कार्यवाह श्री. पंडित यांनी आयोजन केले.

गं. प. पंडित
कार्यवाह, शहापूर शाखा



अनुक्रमणिका

## शाखा - जळगाव

**१७ मार्च २००७** - 'सकाळ साहित्य प्रबोधिनी' जळगावच्या विद्यमाने 'जागतिकीकरण आणि मराठी भाषा' या विषयावर चर्चासत्राचे आयोजन करण्यात आले. त्यामध्ये स्थानिक साहित्यिक आणि विचारवंतांनी आपआपली मते प्रदर्शित केली. प्रबोधिनीचे समन्वयक प्रा. डॉ. किसन पाटील (सदस्य, कार्यकारिणी म. सा. प. पुणे) आणि श्री. चंद्रकांत भंडारी यांनी यशस्वी नियोजन केले. 'सकाळ'चे बातमीदार श्री. सुरेश उज्जैनवाल यांनी आभार प्रदर्शन केले. भाषेची उपयोजित मूल्ये, ज्ञान व व्यवहार भाषा म्हणून महाराष्ट्रातील मराठीचे स्थान वाढविले पाहिजे. तसेच विविध बोली आणि त्यातील साहित्य मराठी भाषेला टिकवून ठेवण्यात महत्त्वाचे योगदान देतात, असे विचार प्रकट करण्यात आले.

**१८ मार्च २००७** - खानदेशस्तरीय तिसरे ग्रामीण साहित्य संमेलन धुळे जिल्ह्यातील शिरपूर तालुक्यात वाघाडी या गावी शिरपूरच्या मराठी बोली साहित्यसंघ, शाखेने आयोजित केले होते. अध्यक्षस्थानी प्रा. सुधीर देवरे यांची निवड करण्यात आली होती. या प्रसंगी मराठी बोली साहित्य संघ, नागपूर या संस्थेचे उपाध्यक्ष आणि म. सा. प. पुणे कार्यकारिणी सदस्य डॉ. किसन पाटील अतिथी म्हणून उपस्थित होते. यावेळी आयोजित 'मराठीच्या विकासात - बोलींचे स्थान आणि बोलींपुढील आव्हाने' या विषयावरील परिसंवादात प्रा.डॉ. शिरीष पाटील, प्रा. डॉ. रमेश सूर्यवंशी, प्रा. सौ. ठाकूर यांनी सहभाग दिला. या परिसंवादाचे अध्यक्षस्थान डॉ. किसन पाटील यांनी भूषविले. कविसंमेलन, कथाकथन आणि ग्रंथदिंडी असा, एक दिवस-रात्रीचा हा भरगच्च कार्यक्रम संपन्न झाला. श्री. ईश्वरभाऊ जैन आणि प्रा. फुला बागूल यांनी परिश्रम घेतले. श्री. सुभाष अहिरे, जगदीश देवपूरकर आणि धुळे जिल्हा बोली साहित्य संघाचे पदाधिकारी यावेळी उपस्थित होते.

कार्यवाह

## शाखा - इचलकरंजी

**साहित्यिक बैठक** - साधारणपणे दर दोन महिन्यांतून अनौपचारिक साहित्यिक बैठकीचे आयोजन, कार्यकारिणी सदस्य व निमंत्रित रसिकांचा सहभाग.

**तिकडून आणलेल्या गोष्टी (कथा वाचन)** - फ्रेंच, स्पॅनिश, जर्मन, जपानी, रशियन, मेक्सिकन या भाषांमधून थेट मराठी भाषांतरित केलेल्या कथांच्या अभिवाचनाचा आशयपूर्ण आणि दर्जेदार असा हा कार्यक्रम येथील 'मनोरंजन मंडळ' या साहित्यिक/सांस्कृतिक संस्थेसोबत आयोजित करण्यात आला.प्रसिद्ध कलाकार अतुल कुलकर्णी, इला भाटे, गीतांजली कुलकर्णी व शार्दूल फडणीस यांच्या उत्कृष्ट अभिवाचनामुळे व सादरीकरणामुळे या कार्यक्रमातून जगातील श्रेष्ठ प्रतिभावंतांच्या साहित्यकृतींचा परिचय साहित्यप्रेमींना झाला. 'कलासक्त पुणे' या संस्थेच्या वतीने निर्मिती केलेला हा कार्यक्रम 'केल्याने भाषांतर' या त्रैमासिकाद्वारा प्रस्तुत करण्यात आला. अनोख्या आणि वेगळ्या शैलीमधील रूपांतरित कथा-वाचनाचा सदरचा कार्यक्रम अभिजात व दर्जेदार झाला. दर्जेदार कथा, वेगळी मांडणी, अनोखा कल्पनाविष्कार, साभिनय प्रभावी वाचन यामुळे जाणकार रसिकांची दाद या कार्यक्रमाला मिळाली.

**शब्द सुरांचे लेणे (सांस्कृतिक कार्यकम)** - कविश्रेष्ठ कुसुमाग्रज, बा. भ. बोरकर, शांता शेळके, गदिमा, पुल, बाबुजी, जितेंद्र अभिषेकी, मंगेश पाडगांवकर इत्यादी प्रतिभावंतांच्या अविस्मरणीय गाण्यांचा कार्यक्रम आयोजित करण्यात आला. मसाप, इचलकरंजी आणि आजीव सदस्य तसेच निमंत्रित देणगीदारांसाठी या कार्यक्रमाचे आयोजन करण्यात आले. 'वसंत वलय, मुंबई' निर्मित या कार्यक्रमाची संकल्पना व निवेदन प्रसिद्ध कलाकार विघ्नेश जोशी यांचे होते. या कार्यक्रमात कल्याणी जोशी, गौतम मुर्डेश्वर, प्रियंका भट, नरेंद्र रानडे यांनी गायक कलाकार म्हणून तर राजू किल्लेकर, सुहास चितळे व राजा केळकर यांनी वादक कलाकार म्हणून सहभाग घेतला. सदाबहार गाणी, उत्कृष्ट निवेदन आणि सुरेल व दर्जेदार गायन यामुळे या कार्यक्रमास रसिकांचा उत्स्फूर्त प्रतिसाद मिळाला.

**साहित्यिक उपक्रम सहभाग** - या कार्यक्रमांबरोबरच शहरातील रोटरी क्लब सेंट्रल, मनोरंजन मंडळ, आपटे वाचन मंदिर, प्रबोधन वाचनालय, इ. संस्थांच्या साहित्यिक व सांस्कृतिक कार्यक्रमात मसाप प्रतिनिधी या नात्याने कार्यकारी सदस्यांची उपस्थिती होती.

**राजन मुठाणे**
**कार्याध्यक्ष**

## शाखा - बार्शी

२६ नोव्हेंबर २००६ : महाराष्ट्र साहित्य परिषद पुणे कार्यकारी मंडळाने बार्शी येथे शाखा सुरू करण्यास मान्यता दिली असल्याचे कार्याध्यक्ष मा. डॉ. गं. ना. जोगळेकर यांनी जाहीर केले. या सभेस विशेष निमंत्रित म्हणून बार्शी येथील श्री. श्यामसुंदर मुळे, श्री. पां. न. निपाणीकर, श्री. शब्बीर मुलाणी, ॲड. प्रशांत शेटे उपस्थित होते.

३० नोव्हेंबर २००६ रोजी बार्शी शाखेची सर्वसाधारण सभा आयोजित करण्यात आली. सभेत कार्यकारी मंडळाची निवड होऊन पुढीलप्रमाणे नवीन कार्यकारिणी जाहीर करण्यात आली.

अध्यक्ष - श्री श्यामसुंदर मुळे
उपाध्यक्ष - श्री. सुरेश पाठक
कार्याध्यक्ष - ॲड. प्रशांत शेटे
प्रमुख कार्यवाह -श्री. शब्बीर मुलाणी
सहकार्यवाह - श्री. प्रकाश गव्हाणे
कोषाध्यक्ष - डॉ. प्रशांत मोहिरे
सदस्य -श्री.पां.न.निपाणीकर, श्री.मुकुंदराज पं. कुलकर्णी, श्री.के.ए.देशपांडे, प्रा.डॉ.बी.डी.पारसे, श्री.जयसिंह चंदेले, प्रा.चंद्रशेखर कोरे,प्रा.अनुराधा केसकर, सौ. सुवर्णा शिवपुरे, सौ.सत्यभामा जाधव. निर्वाचन अधिकारी म्हणून सोलापूर जिल्हा प्रतिनिधी पद्माकर कुलकर्णी यांनी काम पाहिले.

१६ डिसेंबर २००६ : महाराष्ट्र साहित्य परिषद, बार्शी-शाखा उद्घाटन सोहळा म. सा. प. पुणेचे अध्यक्ष प्रा. द. मा. मिरासदार, कार्याध्यक्ष डॉ. गं. ना. जोगळेकर, प्रमुख कार्यवाह डॉ. वि. भा. देशपांडे, कार्यवाह प्रा. मिलिंद जोशी, पद्माकर कुलकर्णी यांच्या उपस्थितीत मातृमंदिर सभागृहात संपन्न झाला. श्री.राधेश्याम रामदयाल भराडिया यांच्या अध्यक्षतेखाली संपन्न झालेल्या या कार्यक्रमाची सुरुवात बार्शीच्या स्थानिक गायिका सौ.अर्चना पानसे यांच्या स्वागत गीताने झाली. शाखा पदाधिकारी यांच्या हस्ते सर्व प्रमुख पाहुण्याचा सत्कार करण्यात आला. या सोहळ्यास पुणे येथील ॲड. ज्ञानेश्वर कुलकर्णी तसेच बार्शी येथील अनेक स्तरातील मान्यवर महिला, पुरुष बहुसंख्येने उपस्थित होते. कार्यक्रमाचे सूत्रसंचालन श्री. मुकुंदराज कुलकर्णी आणि डॉ. प्रशांत मोहिरे यांनी केले.

१६ डिसेंबर २००६ : म. सा. प. शाखा उद्घाटन सोहळ्याचे औचित्य साधून खास मिरासदारी शैलीतील 'विनोदातील गुरुशिष्य' हा कथाकथनाचा कार्यक्रम परिषदेने आयोजित केला.

२५ जानेवारी २००७ : म.सा.प. बार्शी शाखा कार्य-कारिणीची प्रथम सभा संपन्न झाली. महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या घटनेप्रमाणे कार्यकारी मंडळावर दोन स्वीकृत सदस्य नेमले. केंद्र नियुक्त प्रतिनिधी म्हणून सौ. सुमन शिवानंद चंद्रशेखर याचे नाव जिल्हा प्रतिनिधी श्री. पद्माकर कुलकर्णी यांनी सुचवले आणि स्थानिक स्वीकृत सदस्य म्हणून श्री. शरद मोतीलाल खडके यांची नियुक्ती करण्यात आली.

शब्बीर मुलाणी
प्रमुख कार्यवाह

---

## शाखा - श्रीरामपूर

८ ऑक्टोबर २००६ रोजी श्रीरामपूर, आगाशे सभागृहात मसाप अध्यक्ष मा. ॲड्. रावसाहेब शिंदे यांच्या अध्यक्षते-खाली शाखेच्या सदस्यांची सर्वसाधारण सभा घेण्यात आली. त्यामध्ये पुढीलप्रमाणे कार्यकारिणी निवडण्यात आली.

अध्यक्ष - ॲड्. रावसाहेब शिंदे
उपाध्यक्ष - श्री. अविनाश आपटे
कार्याध्यक्ष - श्री. प्राचार्य टी. ई. शेळके
प्रमुख कार्यवाह - प्रा. डॉ. बाबूराव उपाध्ये
कार्यवाह - सौ. भाग्यश्री बडे
कोषाध्यक्ष - डॉ. कमलजित कौर बतरा
सदस्य -डॉ. रवींद्र कुंटे, श्री. दिनकरराव पोखरकर,सौ. हर्षदा पंडित, प्रा. विनायकराव बंगाळ, श्री. विजयराव नगरकर, श्री. शिवाजी एकनाथ काळे, श्री. अशोकराव निवृत्ती बनकर पा., श्री. ब. ल. गाढे, श्री. सत्यनारायण शेळके तसेच साहित्यिक नामदेवराव देसाई आणि कवि बाबासाहेब सौदागर हे दोन स्वीकृत सदस्य.

सौ. भाग्यश्री बडे यांना वाचक - ग्रुप, पुणे स्पर्धेत पुरस्कार मिळाल्याबद्दल अभिनंदनाचा ठराव घेतला.

हेरंब कुलकर्णी, नामदेवराव देसाई, प्रा. हंबीरराव नाईक यांच्या व्याख्यानांचे आयोजन केले.

प्राचार्य टी. ई. शेळके
कार्याध्यक्ष

# म.सा.प.
# नवे आजीव सभासद

१) फरांडे प्रसन्नकुमार डॅनियल ऊर्फ श्याम फरांडे, पुणे
२) करंबळेकर मनोहर, इंदौर
३) गोडवोले सायली विनयचंद्र, पुणे
४) हुतके विक्रम रामचंद्र, पुणे
५) प्रभू मीना सुधाकर, पुणे
६) पटेकर देवराम तात्याबा, अहमदनगर
७) कुलकर्णी गणेश रमेश, पुणे
८) कोळपे छाया काळूराम, पुणे

बार्शी येथील सभासद

९) आवटे माधुरी प्रदीप
१०) कदम अशोक भोजवा
११) करंजकर बालाजी भाऊराव
१२) कश्यपी दत्तात्रय ग.
१३) कुंकूलोळ अजित सुरेशचंद्र
१४) कुलकर्णी मुकुंदराज पंडितराव
१५) केसकर अनुराधा मुरलीधर
१६) कोरे चंद्रशेखर हनुमंत
१७) खडके शरद मोतीलाल
१८) खेडेकर भारती दिलीप
१९) गंभीर चंद्रहास बापुजी
२०) गव्हाणे प्रकाश विश्वंभर
२१) गोसावी दत्तात्रेय भिमगिरि
२२) घुगरे सूर्यकांत
२३) चंद्रशेखर सुमन शिवानंद
२४) चंदेले जयसिंह बाबीराम
२५) जगदाळे सुभाष कल्याणराव
२६) जाधव महारुद्र विष्णू
२७) जाधवराव सत्यभामा हरिदास
२८) जोशी रजनी रामचंद्र
२९) जोशी शरद जनार्दन
३०) जोशी शरदचंद्र भालचंद्र
३१) टाकळीकर शांताबाई भानुदास
३२) देवणे विवेक बसवेश्वर
३३) देशपांडे कृष्णाजी अनंत
३४) देशपांडे नारायण पांडुरंग
३५) देशपांडे मनोज मधुकर
३६) देशमुख प्रभाकर खंडेराव
३७) देशमुख प्रमिला माणिकराव
३८) निपाणीकर पांडुरंग नरहरराव
३९) निमकर विक्रम जनार्दन
४०) पवार श्यामराव रघुनाथ
४१) पाठक सुरेश विठ्ठल
४२) पानगांवकर शारदा नागनाथ
४३) पारसे विरा दशरथ
४४) मुलाणी शब्बीर वक्षुभाई
४५) मोहिरे प्रशांत विठ्ठलराव
४६) मस्तूद कृष्णा दगडू
४७) मांजरे यमुना श्रीपती
४८) मुळे श्यामसुंदर दत्तात्रेय
४९) मोरे संजय चंद्रकांत
५०) बरगुडे प्रकाश गोविंद
५१) राऊत सुरेश शंकर
५२) शिवपुरे सुवर्णा किशोर
५३) शिंदे हेमंत तुकाराम
५४) शेटे प्रशांत विश्वासराव
५५) शेळके मधुकर शिवाजी
५६) सावळे दीपा गणेश
५७) साळुंके दत्तात्रय शंकर
५८) शेळके टी.ई., श्रीरामपूर
५९) तायडे अनिता दत्तात्रेय, धुळे
६०) ततार क्रांती त्र्यंबक, धुळे
६१) गद्रे रघुनाथ नारायण, पुणे
६२) कुलकर्णी जितेंद्र श्रीविलास, पुणे
६३) तरवडे शिल्पा, पुणे
६४) कोरे महादेव इराप्पा, पुणे
६५) पाटील पद्मा प्रकाश, पंढरपूर
६६) महाडिक शारदा, पंढरपूर
६७) गायकवाड जयमाला मनोहर, पंढरपूर
६८) गावडे संध्या हनमंत, पंढरपूर
६९) जोशी योगिनी संजय, पुणे
७०) मिसाळ प्रकाश अनंतराव, पुणे
७१) वेळापुरे प्रशांत विनायक, पंढरपूर
७२) जाधव माधव मुरलीधर, पंढरपूर
७३) गव्हाणे विलास किसनराव, चिंचवड
७४) देशपांडे सुहास, जळगाव
७५) तुपकर उषा जैनेंद्रकुमार, सोलापूर
७६) केंजळे विनोद गोविंद, पुणे
७७) चिंधडे शुभदा शेखर, मुंबई
७८) सोनवणे शामकांत सुरेश, पुणे
७९) बारटक्के सुहास दत्तात्रय, चिपळूण
८०) सोनार सुधाकर दत्तात्रेय, चिपळूण
८१) सुमेध वडावाला रिसबुड, मुंबई
८२) पारसनीस रवींद्र वसंत, पुणे
८३) कवळे वैशाली, खेड, (रत्नागिरी)
८४) वैद्य विनायक रघुनाथ, खेड, (रत्नागिरी)
८५) पायेर मयुर गोविंद, खेड, (रत्नागिरी)
८६) साळुंखे रेखा सदाशिव, खेड, (रत्नागिरी)
८७) पाटणे विपिन दादा, खेड, (रत्नागिरी)
८८) लिमये पुरुषोत्तम यशवंत, खेड, (रत्नागिरी)



अनुक्रमणिका

महाराष्ट्र साहित्य परिषद

## देणगीदार

२६ डिसेंबर २००६ ते ३१ मार्च २००७

१) पॉप्युलर बुक हाऊस, पुणे ५००१/- योगक्षेमार्थ देणगी

२) श्री. बाळकृष्ण आबाजी नाणेकर, पुणे १०००/- ग्रंथालयासाठी

३) श्री.गोविंद श्रीराम तांबोळी १०००/- ग्रंथालयासाठी

४) श्रीमती मंदा नाईक ५०१/- इमारत निधी

५) जी.एन्.नातू ट्रस्ट ५०००/- इमारत निधी

६) एस्.डी.पंडित ट्रस्ट ५०००/- इमारत निधी

७) डॉ.मंदा खांडगे १०, ०००/- स्मृतिदिनासाठी

८) पूना चिप स्टोअर्स १५००/- ग्रंथालयासाठी

९) इ एल एफ फिलॅमेंट इंडस्ट्रिज प्रा. लि. ११००१/- इमारत निधी

१०) डॉ.मु.श्री.कानडे १०, ००० ग्रंथालयासाठी

११) श्री.रा.पा.पेंडसे १००/- बालविभागासाठी

१२) श्री.डी.व्ही.जोशी ५००/- इमारत निधी

१३) श्री. प्राचार्य एन्. जी. काळे ५०००/- इमारत निधी

१४) श्रीमती मीनाक्षी केळकर २००/- दिवाळी अंक बालविभाग पारितोषिकासाठी देणगी

१५) श्री. श्रीकांत. द. पळसुले ५०००/- ग्रंथालयासाठी देणगी

१६) मा.मालती वि.माटे ३०, ०००/- इमारत निधी

१७) मा. विष्णू गणेश माटे ३०, ०००/- इमारत निधी

१८) महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ ४,००,०००/- अनुदान

१९) डॉ.हेमंत दाबके ५०००/- ग्रंथालयासाठी देणगी

२०) मा.चंद्रकांत शेवाळे ३०००/- दिवाळी अंक पारितोषिकासाठी देणगी

२१) इंदिरा बेहेरे चॅरिटेबल ट्रस्ट ३१५००/- योगक्षेमार्थ देणगी

२२) श्री. राघवेन्द्र अं. माडगूळकर १५०००/- स्मृतिदिनासाठी देणगी

२३) अहिल्यादेवी हायस्कूल शिक्षक वर्गाकडून ५०, ०००/- ग्रंथालयासाठी देणगी

२४) अहिल्यादेवी हायस्कूल शिक्षक वर्गाकडून १२५०/- ग्रंथालयासाठी देणगी

२५) सौ. अमृता खाकुर्डीकर ५०००/- नाट्यविभागासाठी

२६) श्रीमती. निर्मला गोगटे ५०००/- नाट्यविभागासाठी

२७) श्रीमती प्रभावती कुलकर्णी २५००/- नाट्यविभागासाठी

२८) न्या. प्रताप ना. बेहेरे १८, ०००/- ग्रंथालयासाठी देणगी

२९) न्या. प्रताप ना. बेहेरे १८, ०००/- नाट्यविभागासाठी देणगी

३०) ग्रंथालय संचालनालय, मुंबई २५००/- ग्रंथालयासाठी देणगी

# स्वागत

## म.सा.प.कडे अभिप्रायार्थ आलेल्या पुस्तकांची नोंद

साकेत प्रकाशन प्रा.लि, औरंगाबाद

| | |
|---|---|
| ■ दशक्रियाची उत्तरक्रिया | किशोर सानप |
| ■ या देशात आवाज कुणाचा | संजय वरकड |
| ■ गोष्टी गणरायाच्या | श्रीकांत षु.काशीकर |
| ■ शेंदरी (-) लागवड | शिवाजीराव ठोंबरे |
| ■ असा करावा अभ्यास | प्रभाकर मोरे |
| ■ धीरूभाई अंबानी | दिवाकर बापट |
| ■ निर्माल्य | रघुवीरसिंह राजपूर |
| ■ जॉनी वॉकर | दिवाकर बापट |

स्नेहवर्धन प्रकाशन, पुणे

| | |
|---|---|
| ■ मराठी काव्यातील स्त्री चित्रण - | वेदश्री थिगळे |
| ■ उभ्या आडव्या रेषा | शांता लागू |
| ■ भाव संवाद | संपा.राजश्री मराठे |
| ■ तरंग | विनीता आपटे |
| ■ नाट्याक्षरे | संपा.मधुरा कोरान्ने |
| ■ आनंद यात्रिक | शशिकला देसाई |
| ■ अभ्यासाची नवी पध्दत | महावीर पांढरे |
| ■ एकनाथ कालीन मराठी वाङ्मय | हे. वि. इनामदार, जोशी वसंत स. |
| ■ श्रीराम प्रकाशन मुंबई | |
| ■ प्रतिशोध | सुजाता जोग |

मुक्तरंग प्रकाशन, लातूर

| | |
|---|---|
| ■ मराठवाड्याची आई | संपा. रामदास केदार |

शारदा प्रकाशन, ठाणे

| | |
|---|---|
| ■ सारे स्वल्पविराम | सुमन नवलकर |
| ■ कागदी होड्या | सुमन नवलकर |
| ■ गोंधळात गोंधळेकर | सुमन नवलकर |

जानाई प्रकाशन

| | |
|---|---|
| ■ गर्भझाला | रामदास कदम |

मधुश्री प्रकाशन, पुणे

| | |
|---|---|
| ■ अतृप्ता | मनोहर भानत |
| ■ विद्रोही | |
| ■ ट्रँग्युलर लव्ह | |
| ■ अनोखे प्रेम | |
| ■ असून पुरूषा | " |
| ■ प्रहार | एन.आर चौगुले |
| ■ कडकडणारी पाने | दिनेश पांगी |

ऋचा प्रकाशन, नागपूर

| | |
|---|---|
| ■ बाजार | जगन्नाथ पाटील |
| ■ भक्ती | " |
| ■ जीवन मन | |
| ■ नेताजी | |
| ■ व्यक्ती आणि प्रकृती | |
| ■ जीवन गाणे | |

पराग एजन्सी, अकोला

| | |
|---|---|
| ■ निर्धार | शीला पाटणकर |
| ■ विश्वस्त | " |
| ■ पत्र लिहण्यास कारण की | |
| ■ त्या तिथे पलीकडे | |

सोनल प्रकाशन, दर्यापूर

| | |
|---|---|
| ■ वऱ्हाडी लोक भाषा | प्रतिमा इंगोले |
| ■ चेअरमन | अशोक कुलकर्णी |
| ■ तंगाई | महादेव केशव गायकवाड |

राजहंस प्रकाशन, पुणे

| | |
|---|---|
| ■ हा तेल ना इतिहास आहे | गिरीश ओक |
| ■ दीपस्तंभ | कमलेश वालावकर |
| ■ प्रयोगातून विज्ञान | माधुरी शानभाग |

सुविद्या प्रकाशन, सोलापूर

| | |
|---|---|
| ■ कार्टून काढू या | हेमंत कपूरे |
| ■ कंदी | रजनीस जोशी |
| ■ ओळख | अलका कुलकर्णी |
| ■ संस्कार कथा | अवधूत |
| ■ संस्कार पराग | |
| ■ महानिधी विदुर | नरेंद्र कुटे |
| ■ कथा वीणाची | पन्नालाल मुराणा |
| ■ छिन्न मस्ता | इंदिरा गोस्वामी |
| ■ आपले साने गुरुजी | विश्वास पाटील |



अनुक्रमणिका

| | |
|---|---|
| ■ मूल्य आणि मूल्यांकन | निशिकांत ठकार |
| स्नेहवर्धन प्रकाशन, पुणे | |
| ■ निवडणूक लढवा निवडणूक जिंका | य.ग.शिंदे |
| ■ रेशीमधारा | शंतनू चिंधडे |
| ■ विष्णु सहस्त्रनाम | श्रीपाद कोचक |
| ■ संतसंग | प्र.न. जोशी |
| ■ गोंदणवेणा | सुरेश पाचकवडे |
| ■ मराठीतील आत्मचरित्रपर लेखन | उषा हस्तक |
| ■ शिव पब्लिकेशन, पुणे | |
| ■ क्रांतिवीर सावरकर | म.श्री.दीक्षित |
| ■ कर्मवीर प्रकाशन पुणे | |
| ■ आकाशाची फुले | उमेश तेंडुलकर |
| अजब पब्लिकेशन्स, कोल्हापूर | |
| ■ क्षण कसोटीचे | शांता नारकर |
| सुविद्या प्रकाशन, पुणे | |
| ■ साहित्य,समाज व संस्कृती | संपा. |
| भूमी प्रकाशन, लातूर | |
| ■ स्वरूप | माधव कदम |
| मंगेश प्रकाशन, नागपूर | |
| ■ खुदा-गॉड फादर आणि बाकी ज्यादाही | विजय राज |
| मधुराज पब्लिकेशन प्रा.लि., पुणे | |
| ■ ढेकरोजी ढेरपोटे | वसुंधरा हुईलगोल |
| स्नेहवर्धन पब्लिकेशन हाऊस, पुणे | |
| ■ कस्तुरबा गांधी | निर्मल गोपाळ किरणे |
| ■ विज्ञान कथा विश्व | शिवाजीराव मोहिते |
| ■ उल्लेखनीय | मधुकर मोकाशी |
| ■ हिरव्या डहाळ्या | महावीर जोंधळे |
| ■ दिंड्या गावोगावच्या | बाबूराव हिरडे |
| ■ भुवन मनमोहिनी | अरुण फिरोदिया |
| सारंग प्रकाशन, पुणे | |
| ■ सोप्या गोष्टी | श्रीपाद काल |
| संचालक विस्तार व प्रशिक्षण विभाग, नागपूर | |
| ■ पशु प्रजनन | नितीन मार्कंडेय |
| उद्रवेल प्रकाशन, ठाणे | |
| ■ मी+मी+मी | सुनंदा प्रकाश राव |
| ■ भारद्वाज प्रकाशन | |
| ■ हरवले ते | मधुकर विष्णू सोवनी |

| | |
|---|---|
| सुजा प्रकाशन, पुणे | |
| ■ मनातले सारे | संजय डोळे |
| सुयश प्रकाशन, नवी सांगवी | |
| ■ अण्णा भाऊ साठेंच्या कथा | विठ्ठल साठे |
| देशमुख आणि कं.पब्लिशर्स प्रा.ली., पुणे | |
| ■ अतीताची लेणी | म.श्री.माटे |
| ■ इडा पिडा | आसाराम लामटे |
| मंगेश प्रकाशन, नागपूर | |
| ■ अन्त्य संस्कार | श्रीकांत चोरघडे, स्नेहलता देशमुख |
| ■ नाती गोती | श्रीकांत चोरघडे |
| दिलीप अधिकारराव शिंदे, सांगली | |
| ■ कविता अंतरीच्या | अस्मिता इनामदार |
| (राज) मयूर प्रकाशन, पुणे | |
| ■ छत्रपती शिवाजी महाराज | रा.आ.कदम |
| पूजा प्रकाशन जाभोद, जळगाव | |
| ■ गुंतलेले धागे | सदानंद सिनगारे |
| रामकृष्ण ना.गंथेवार प्रकाशक, नागपुर | |
| ■ भावनेचा मळा | रेखा रामकृष्ण गंधेवार |
| बंधुता प्रकाशन, पिपळेगुरव पुणे | |
| ■ स्पंदन | मीना शिंदे |
| हिरण्यकेशी प्रकाशन, कोल्हापूर | |
| ■ मायेची माणसं | शशिकांत फडणीस |
| प्रकाशक मंगल कणसे, अकोले | |
| ■ उदय | मेघना कणसे |
| ग्लोरिया प्रकाशन, पुणे | |
| ■ भगवान परशुरामाची भूमी कोकण | माधव कोंडविलकर |
| रंगसभा प्रतिष्ठान, वसंतनगर | |
| ■ उत्सव | मीरा शंकर |
| रजत प्रकाशन, औरंगाबाद | |
| ■ कविकुलगुरुचा अस्त | श्री. दि. इनामदार |
| ■ निळ्या सूर्याची सावली | ,, |
| चिन्मय प्रकाशन, पुणे | |
| ■ श्री.जे. | दि.वा.जोशी |
| मॅजेस्टिक प्रकाशन, मुंबई | |
| ■ प्राचीन शास्त्रज्ञांच्या गोष्टी भाग १/२ अरविंद औंध | सुरेश मधुर आणि मकरंद राजाध्यक्ष |
| ■ रगडा | सदानंद देशमुख |

■ गंगाजळी — श्री.ना.जोशी

प्रतिमा प्रकाशन, पुणे
■ गोपाळ गणेश आगरकर — ग.प्र.प्रधान
■ महाराष्ट्रातील जातिसंस्था विषयक विचार — यशवंत सुमंत
■ गुरुदेव योगेश्वर अ.ल.भागवत यांचे अनुभव — मच्छिंद्र भोरे
■ बालशिक्षण बाल साहित्य — मंदा खांडगे
■ विविध आयाम — लीला दीक्षित
■ पान चुना तंबाखू — काशिनाथ वाडेकर

वीणा प्रकाशन, जळगाव
■ वज्रमूठ — डी.बी.जगतपुरीया

नभ प्रकाशन, अमरावती
■ कविता उगाच — आ.भा.वाड

गौरव ग्रंथ, कोल्हापूर
■ म.भा.भोसले — प्रकाश कुमार

श्री विद्या प्रकाशन, पुणे
■ मराठी मौखिक वाङ्मय — संपादन

पॉप्युलर प्रकाशन, मुंबई
■ उत्सुकतेने मी झोपतो — श्याम मनोहर

मौज प्रकाशन गृह, मुंबई
■ भाषा व्यवहार व भाषा — सुरेंद्र ग्रामोपाध्ये
■ बखर पर्यावरणांची — अतुल देऊळगांवकर
■ बहुपेडी विंदा — विजय राजाध्यक्ष

दिलीप धामणकर, पुणे
■ आश्ना — मंजिरी धामणकर

ऋध्दी प्रकाशन, उरळीकांचन
■ ऋतुप्रीता — भास्कर भोसले

प्रत्यय प्रकाशन, कोल्हापूर
■ वटवृक्ष — विद्या शिंदे
■ बरेच काही आहे — शशिशेखर शिंदे

राजहंस प्रकाशन, पुणे
■ कुरुक्षेत्र — सुबोध जावडेकर
■ वाङ्मयकोश खंड ३रा — वा. के. लेले

तुका म्हणे प्रकाशन, बुलढाणा
■ अन्नदात्याची धुळाक्षरे — भगवान ढग

महाजन पब्लिकेशन, पुणे
■ जीवनाच्या वाटेवरून — के.जी.कदम

साकेत प्रकाशन, औरंगाबाद
■ भूतल स्वर्गातील घायाळ वसंत — अनु. अरुणा लोखंडे
■ माहितीचा अधिकार २००५ — मंजुषा मुथा
■ सेंद्रिय शेती बुवाबाजी आणि शास्त्र — बापू अडकिने

नीहारा प्रकाशन, पुणे
■ नजराणा — सुभाष पवार

अनमोल प्रकाशन, पुणे
■ कथाकार पंडित महादेव शास्त्री जोशी — शुभलक्ष्मी भा.जोशी

यशराज प्रकाशन, उस्मानाबाद
■ सोनेरी सपान — जगदीश गिरी

माधवी प्रकाशन, पुणे
■ दिडदा — सुनेत्रा नकाते

गोमंतक मराठी अकादमी
■ रणांगण समीक्षेची साठ वर्षे — एस.एस. नाडकर्णी

त्रिदल प्रकाशन, मुंबई
■ स्त्री मुक्ती हवीय कुणापासून — कु. मधुरा गोसावी पण

■ शायरी जगलो आम्ही — उषा कुमारी

अक्षरमंच प्रकाशन, कल्याण
■ सा ऽऽऽ — डॉ.मधुमुदन घाणेकर

खंदील प्रकाशन, ताथावडं
■ तांबाटी — डॉ.मधूसुदन घाणेकर

प्रतिभा प्रकाशन, औरंगाबाद
■ रश्मिरथी — अनुवाद- अमृत देशमुख (राष्ट्रकवी दिनकर)
■ मागे वळून पाहता — अमृत देशमुख

नटरंग प्रकाशन, मुंबई
■ साजण छैलछबेला (लावणी रचना) — प्रा.डॉ.चं.वि.जोशी

ऋचा प्रकाशन
■ भिंगरी — निर्मला देशपांडे

निर्मलसुधा प्रकाशन
■ रातराणी — सुधाकर देशपांडे

शब्दालय प्रकाशन
■ आवानओल — अजय कांडर

सुविद्या प्रकाशन, सोलापूर
■ कुंपण वेदनांचे — मारुती कटकधोंड

मुक्तरंग प्रकाशन, लातूर
- अपूर्व भेट — र.श्री.चौधरी

मौज प्रकाशन, मुंबई
- गिग्री कांजली — मीना प्रभू
- तुका नाभा
- अनंतमूर्ती यांच्या कथा — अनु.उमा.वि.कुलकर्णी
- ज्ञानेश्वरीचा काव्यबंध — म.सु.पाटील
- लंडन बॉम्बिंग (२००५) — निळू दामले
- मुखवटे — मंगेश पाडगांवकर

मॅजेस्टिक प्रकाशन, मुंबई
- फिरविले अनंते — फिरोज रानडे
- नवलाई — सुधीर सुखटनकर
- वकितया पारधी — लक्ष्मण गायकवाड
- साडे सहावा महापुरुष — मुकुंद टांकसाळ
- बिननावाचा माणूस — अवधूत परळकर

राजहंस प्रकाशन, पुणे
- मुंबईचा अन्नदाता — शोभा बोन्द्रे
- ट्रॉफीज — उदयसिंगराव गायकवाड
- कथा बारा अक्षरांची — उदयसिंगराव गायकवाड
- आरंबळ — रा.गो.चवरे

अस्मिता ट्रस्ट, उल्हासनगर
- मदिरालय — अनु.वसंत वागुल
- समग्र डॉ.ना.गो. नांदापूरकर भा.१व२ — डॉ.विद्या देवधर

कैलास पब्लिकेशन, औरंगाबाद
- समाजसुधारकांची तुतारी — अनंत राऊत
- प्रजासत्ताक भारताची नैतिक मूल्ये — अनंत राऊत

स्नेहवर्धन प्रकाशन, पुणे
- लोकगीतांचे माझे स्मरण — संपा.य.ग.शिंदे
- सात कवडसे — संपा.शंतनु चिंधडे
- क्रांतीचे आभाळ — धनंजय वाघमारे

नर्मदा पब्लिशिंग हाऊस, पुणे
- काव्य कस्तुरी — संपादन

कर्मवीर प्रकाशन, पुणे
- ललितरंग — संपादन

लोकवाङ्मय गृह प्रा. लि., मुंबई
- शोधनिबंधाची लेखन पद्धती — संपा. स. गं. मालसे

शारदा प्रकाशन, ठाणे
- उद्रेक — विजय-कोळसे पाटील

श्रीराम कल्चरल ट्रस्ट, मुंबई
- सांस्कृतिक महाराष्ट्राचे शिल्पकार गोविंदराव टेंबे — चारूशीला दिवेकर

श्री विद्या प्रकाशन, पुणे
- जागतिकीकरण उदारीकरण आणि अर्थकारण — पद्माकर दुभाषी
- मराठीतील स्त्री आत्मचरित्रांचा सामाजिक अंगाने अभ्यास — श्रुती श्री. वडगबाळकर

समिश प्रकाशक
- वैदर्भीय कथेतील स्त्री व्यक्तिरेखा — पूजा अकोलकर

श्री साई अमृत प्रकाशन, पुणे
- दिलासा देई साई — सुरेश पोरे

अनुश्री प्रकाशन, पुणे
- हसण्यावारी — मिलिंद जोशी

राजहंस प्रकाशन, पुणे
- ब्रश माइलेज — रवी परांजपे
- जल आक्रमिले — सुमेध वडावाल
- जेम्स कॅनिंग (हॅम ग्रँट डफ) — अ.रा.कुलकर्णी

महाराष्ट्र ग्रंथ भांडार, कोल्हापूर
- मर्ढेकर आणि टीकाकार, भ्रांत कोण? — आचार्य विवेक गोखले
- ग्रामविकास महर्षी - असाही एक ध्येयवेडा — ॲड.श्री.वा.दातार
- प्रेरणा — कवी श्री.वा.दातार
- श्रीसाई दर्शन — कवी श्री.वा.दातार

अनुबंध प्रकाशन
- चरित्रं अशी घडतात — प्रा. मिलिंद जोशी

■

## विनम्र अभिवादन !



**श्री.ना.पेंडसे - एका महापर्वाची इतिश्री**

कादंबरी, नाट्य, कथा, व्यक्तिचित्रणे आणि समीक्षा
अशा साहित्याच्या राजमार्गावरून
माणूसपणाचे बहुविध दर्शन घडविणारा
मराठी साहित्यातील दीपस्तंभ.

Maharshtra Sahitya Patrika. Quarterly : Jan. to March 2007 Registerd with the registrar of Newspaper for India under No.6398 / 57



प्रेषक प्रति बुक-पोस्ट




प्रमुख कार्यवाह,
**महाराष्ट्र साहित्य परिषद,**
टिळक रस्ता, पुणे - ४११०३०.
दूरभाष - ०२० - २४४७५९६३.



